प्रियाराधन म्हणजेच

# संगीत-श्रीमुखांत



लेखक

श्री. यशवंत गोपाळ जोशी



---

प्रकाशक—गणेश महादेव आणि कंपनी
६०८ सदाशिव पेठ, पुणें शहर

---

किंमत ~~[illegible]~~ रु. १-०-०

# वाचकांशीं हितगुज—

नांव माहीत नसलेल्या फुलाचें 'नांव' जर आपण एखाद्याला विचारलें तर 'विलायती फूल' म्हणून जसें हटकून उत्तर मिळतें, त्याप्रमाणें नाटकें लिहावयाची तीं भाषान्तरित किंवा रूपान्तरितच लिहावयाचीं, असा समज असलेल्या माझ्या कांहीं मित्रांना खाजगी बैठकींत मी हें नाटक वाचून दाखविलें असतां त्यांनीं उद्गार काढले कीं 'नाटक बरें आहे पण तें रूपान्तरित—अगर एखाद्या इंग्लिश नाटकाच्या आधारावर लिहिलेलं आहे!' ही गोष्ट मी नाकारतांच कोणत्या नाटकाच्या आधारावर मी नाटक लिहिलें आहे तें एका आठवड्यांत कळवितों, असे सहा महिन्यांपूर्वीं बैठकींत सांगून गेलेले मित्रवर्य अद्याप परत भेटलेले नाहींत! त्यांचें संशोधन पुरें झालें म्हणजे मी हें नाटक कोणच्या इंग्रजी नाटकाच्या आधारावर लिहिलें आहे तें जाहीर करीन; कारण मला सदर पुस्तकाची कांहींच माहिती अद्याप नाहीं!

मला सदर नाटकाची कल्पना सुचली ती अशी—बहुशः कोणच्याही नाटक-कादंबरींत पहा—नायक नायिकांची—प्रेमाची ठराविक पद्धतीची देवघेव होऊन—शेवटीं त्यांचें लग्न लागतें. हीच कल्पना—पण फक्त उलटीकडून पाहिल्यास—झालेलें लग्न नाकबूल करायला लावून—जरा 'गंमत' लिहितां येईल असें वाटलें. म्हणून अगोदरच लग्न झालेलें जोडपें अविवाहितपणाच्या पेहेरावांत रंगविलें आहे. सदर जोडपें कितपत 'हास्य' उत्पन्न करतें हें पहाणें रसिक प्रेक्षकांकडे आणि वाचकांकडे आहे!

सदर नाटक 'प्रयोगाकरितां' म्हणून पुणें येथील भारत-गायन-समाजानें हौसेनें निवडलें. त्याबद्दल सदर संस्थेचे सेक्रेटरी

रा. गणेश कृष्ण माटे व बाळाजी जगन्नाथ जोगळेकर वकील यांचा मी आभारी आहें. नाटकांतील पदांच्या चाली—समाजाचे एक चालक रा. बापूराव केतकर यांनीं दिल्या असून सर्व पदें जोगळेकर वकील व त्यांचे बंधू डॉ. जोगळेकर यांनीं केलेलीं आहेत. नाटक कसोशीनें बसविल्याबद्दल व पुस्तकाकरितां फोटो दिल्याबद्दल भारत-गायनसमाजाच्या नटवर्गाचा मी आभारी आहें. पुनरुक्तीचा दोष पत्करून म्हणतों कीं जोगळेकर बंधू व बापुराव केतकर यांनीं सदर नाटक स्टेजवर आणण्याबद्दल जी निरपेक्ष मेहनत घेतली त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें!

तसेंच सुप्रसिद्ध नाटककार श्री. माधवराव जोशी, नटवर्य गणपतराव बोडस व श्रीदत्त प्रिंटिंग प्रेसचे मालक रा. बाबुराव खाडिलकर यांनीं या नाटकांत आपलेपणानें ज्या कांही सूचना केल्या त्यांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

प्रस्तुत पुस्तकाचे प्रकाशक रा. गणेश महादेव वीरकर यानीं माझ्यासारख्या नवख्या नाटककाराच्या पुस्तकाचे प्रकाशन पत्करण्यांत जें धाडस दाखविलें आहे त्याचें चीज पुस्तकाच्या भरपूर विक्रीच्या रूपानें व्हावें अशी माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे व ती पूर्ण करणें सर्वस्वीं वाचकांच्या हातीं आहे!

पुणें
ता. ३१-५-१९३०

नम्र साहित्यसेवक
यशवन्त गोपाळ जोशी

प्रियाराधन म्हणजेच

# संगीत-श्रीमुखांत



या नाटकाचा प्रथम प्रयोग सातारा—सिद्धेश्वर-थिएटरांत ता.३१ मे १९३०रोजीं **भारत-गायनसमाज, पुणें** यांनीं केला· त्या वेळीं कामें करणारांचीं नांवे—

**शाळिग्राम**—बाळाजी जगन्नाथ जोगळेकर,
बी. ए. एल्एल्. बी. वकील.

**वसंत**—त्रिंबक लक्ष्मण ऊर्फ बापुराव केतकर, गवई-भारत-गायनसमाज, व रेडिओ-आर्टिस्ट.

**दिलरुबा**—डॉ. रघुनाथ जगन्नाथ जोगळेकर, एल्. सी. पी. एस्.

**दादासाहेब**—श्रीधर वामन महाजन.

**यादवमामा**—गणेश सदाशिव कुलकर्णी.

**बाबासाहेब**—दिनकर गोविंद दातार, शिक्षक सेवासदन, पुणें व भारत-गायनसमाज पुणें.

**काकासाहेब**—वामन सखाराम केतकर.

**वासंती**—हरी मोरेश्वर घाणेकर, (बी. जे. मेडिकल स्कूल, पुणें.)

**नर्मदा**—गोविंद माधव गोळे, ( सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें. )

**यमुना**—पांडुरंग विष्णु गोडसे.

**पेटीवाले**—गजानन अनंत जोशी, फिड्ल-शिक्षक भारत-गायन-समाज, व रेडिओ-आर्टिस्ट.

**तबलजी**—शिवरामपंत साठे.

**स्टेज-मॅनेजर**—बी. एन्. मुळे, एम्.एस्.सी. (फर्ग्युसन कॉलेज.)

**रंगपट-मास्तर**—धुंडिराज रंगराव पानसे.

श्रीयुत यशवंत गोपाळ जोशी यांचे

अगदीं नव्या धर्तीचें

— सा मा जि क —

हास्यरसात्मक

नवीन नाटक

# हाताला हात!

( अंक १ ते ३ )

॥ श्री लक्ष्मीकेशव प्रसन्न ॥

प्रियाराधन म्हणजेच

# संगीत–श्रीमुखांत



( सूत्रधार व पारिपार्श्वक ईश्वराचें स्तवन करीत आहेत )

[ राग—केदार, ताल—रूपक ]

नमन करूं विमला प्रभुपदां ।
त्रिविध ताप हरतिल झडकरिं ॥
शिवविना जणुं व्यर्थ जीवन ॥ ध्रु० ॥
मूर्ति हरता कष्टि होऊनि । जाइ कैलासासि त्यागुनि ।
ईश्वरी परि शबरि वेषें । भुलवि हर गानें तदा ॥ १ ॥

साकी

नित्य जुन्या कल्पना ऐकुनी प्रेक्षक जन बहु विटले ।
म्हणुनी अभिनवकाव्यकल्पनायुत नाटक हें रचिलें ।
प्रयोग-रूपें तें । दावी प्रेक्षक-वृंदातें ॥ १ ॥

**सूत्रधारः**—परमेश्वराचं स्तवन केव्हांही करा, पावसाचे चार थेंब पडले तरीसुद्धां वृक्षराजी ज्याप्रमाणं ताजीतवानी होऊन अभिनव सौंदर्यानं नटलेली दिसते त्याप्रमाणं परमेश्वराचं अगदीं थोडा वेळ जरी स्तवन केलं तरीसुद्धां मनाला अलौकिक उत्साहाची प्राप्ति होते ! पारिपार्श्वकांनो, ठेवा ही पूजा-सामग्री आंत नेऊन ! कां, अडखळून उभेसे राहिलांत ! हं समजलों, प्रियेला आज हांक

मारायची नाहीं अजिबात ! तुम्ही आंत जा आणि आपआपल्या कामाला लागा ! दर प्रयोगाला तिची मनधरणी कोण करणार ? कांहीं अडत नाहीं कुणाचंही कुणाच्यावांचून ! आणि तशीच वेळ आली तर तुम्हाला नाहीं तर त्याना स्त्रीवेषांत सजवून मी आज वेळ भागवून नेणार आहे. त्या दृष्टीनं मात्र तुम्ही आपआपली तयारी ठेवा म्हणजे झालं ! हं, चला जा आतां—

( पारिपार्श्वक जातात. नटी प्रवेश करिते. )

**नटीः**—( स्वगत ) हें काय, नमन संपून बराच वेळ झाला, अजून मला कुणी कसं बोलवायला आलं नाहीं, म्हणून सहज पाह्यला आलें. हो ग बाई हो ! आजपासून तुला कुणीहि बोलवायला येणार नाहीं, असं कालच मला सांगणं झालं होतं ! विसरलेंच होतें मी तें ! बरं झालं ग बाई लवकर आठवण झाली ती ! नाहीं तर इकडचा स्वभाव म्हणजे काय—विस्तव हातांत धरवेल पण त्यांना नाही हातांत धरवणार--अगदी डोक्यांत राख घालणं झालं असतं ग बाई !

**सूत्रधारः**—( स्वगत ) किती दिवस सहन करायचं हें असं ? एकेकांच्या खोडी अगदीं ठरून गेल्या आहेत ! कांहीं नाविन्याची मौज दाखवितील–कांहीं नाहीं ! आतां आंत जातों—आणि बऱ्या बोलानं ती आली तर ठीक—नाहीं तर अशी एक भडकावतों श्रीमुखांत ( नटीकडे पाहून ) अस्सं ! लवकरच उमजलीस एकंदरीत—

**नटीः**—( स्वगत ) हं, स्वारीनं बरीच डोक्यांत राख घातलेली दिसते आहे एकंदरींत ! आतां मी आपली मुकाट्यानं गपचिप उभी रहातें. पाहू तर पुरी काय गंमत होते ती ! कांहीं

झालं तरी आपण होऊन चकार शब्द काढायचा नाहीं ! अगदीं एखाद्या केळीच्या खांबासारखी उभी रहातें !

**सूत्रधारः**—( स्वगत ) आतां आपणही थोडं पडतं घेतलं पाहिजे ! आपली जरा चुणुक दाखविणार होतों ! अहो, अगदीं प्रेमाचीं नवरा-बायको झालीं—तरी अगदीं खेळीमेळीनं आणि गोडी-गुलाबीन वागायचं वागायचं म्हणजे किती ? अगदीं नवरा कोणचा आणि बायको कोणची हेंही उमगत नाहीसं झालंय हल्लीं ! ( चुटकी वाजवितो. ) शुऽक ! अरे, अगदीं पहात नाहीं इकडे ! रागावली वाटतं ?

**नटीः**—( स्वगत ) 'शुक' म्हणून मला हांक मारण्याचा प्रयत्न चाललाय वाटतं ? बसा म्हणावं 'शुकऽशुक' करीत ! काय मांजरी बिजरी आहे काय मी ?

**सूत्रधारः**—आतां काय करणार ? ( जवळ जाऊन ) एऽ

**नटीः**—ओ ऽ ऽ

**सूत्रधारः**—औ ऽ ! आज बोलायचा विचार नाहीं वाटतं ?

**नटीः**—नाहीं, नाहीं, नाहीं ! !

**सूत्रधारः**—कां ?

**नटीः**—उगीच ! आपण काल सांगितल्याप्रमाणं मी अगदीं वेळेवर येऊन इथं उभी राहिलें आहे—आणि तरीसुद्धां आपण डोक्यांत राख घातल्यासारखं केलंत म्हणून मी रागावलें आहें.

**सूत्रधारः**—मग काय, समजूत करूं कीं काय तुझी ? होय का ? अग, अगदीं अल्लड पोरीसोरीसारखं काय चालवलं आहेस आज ? अर्धा संसार झाला आपला—चार दोन रांगती चालतीं [illegible]

**नटीः**—आपल्याला कांहीं न करता नाविन्य पाहिजे ना ! मग, आपल्याला जर खरोखरच नाविन्याची गम्मत जम्मत पाहिजे असेल तर—हंसायचं नाही हं गडे—आपल्याला पोरंबाळं झाल्याचं येवढंच नव्हे तर तुमच आणि माझं लग्न झाल्याचंसुद्धा विसराव गडे ! आणि पुन्हां अगदी पहिल्या दृष्टभेटीसारखी प्रणयाची चचल गम्मत जम्मत करावी ! मी बाई आतां अगदी साफ विसरलें आहे तुमचं आणि माझं लग्न झाल्याचं !

**सूत्रधारः**—लाडके, खरंच सुंदर कल्पना शोधून काढलीस ! आजच्या आपल्या या नवीन नाटकाकरिता याच कल्पनेचा आपण उपयोग करूं ! पाहूं या कांही गमत करता आली तर—प्रिये—

( पारिपार्श्वक येतो. )

**नटीः**—नाथ—

**पारिपार्श्वकः**—महाराज, सर्व पात्रांची सिद्धता झालेली आहे.

**सूत्रधारः**—अस्सं का ! उपकारच म्हणायचे या रसिक प्रेक्षकांवर ! अहो, नाटकाची वेळ होऊन गेली—आणि 'सर्व पात्रांची सिद्धता झाली' हें ठराविक वाक्य काय सांगायला आलात आतां ? जा—( पारिपार्श्वक जातो. ) बर प्रिये, प्रसंगाला साजेसं एखादं सुंदर पद म्हण पाहूं—

**नटीः**—( निघून जात जात ) वेड लागलं आतां आपल्याला वेड ! खुद्द नाटकांत मला थोडीं का पदं म्हणायचीं आहेत, म्हणून आतां इथं एक पद म्हणून आवाज बसवून घेऊं मी आपला !

**सूत्रधारः**—( तिला अडवून ) अन्नपूर्णामाई, अगदीं निखालस आचरट आहांत ! या रसिकांना आपण आपल्या सुंदर गाण्याची 'पाणपोई' जरी पुढं घालणार असलांत—तरी आत्याबरोबर

रसिकाचा थोडा तरी मानसन्मान कराल कीं नाहीं? आलेल्या रसिकांना या वमास्मुद्धा नको का म्हणायला?

**नटी:**—( मागे वळून ) खरच, चुकलें! रसिकांनो, माफी असावी!

[ राग—झिंझोटी, ताल—त्रिताल ]

**कसि बाइ अविचारी।**
**विचारी, झाले मी कशि आज यापरी ॥ धृ० ॥**
**रसिक वृंद देखोनि मानसिं।**
**होय म्हणुनि कीं ऐसि बावरी ॥ १ ॥**
**स्वागत करुनी विनती सुजना।**
**नाट्य बघुनि व्हा मुदित अंतरीं ॥ २ ॥**

---

## प्रवेश पहिला

[ स्थळ—रस्ता नर्मदा प्रवेश करते ]

**नर्मदा:**—सकाळची ही सहजसुंदर वेळ पाहून स्टेशनवरून टांगा करून यायचं तीं पायींच निघालें; म्हटलं तेवढाच शरिराला व्यायाम होईल. अगदी हलुबाईपणा तरी काय कामाचा? मनाला कसा अगदीं आल्हाद वाटला पण या सकाळच्या फिरण्यानं! पण आतां या वासंतीच्या घराचा पत्ता कोण सांगणार मला? मगाशीं रस्त्यांत सहज एका बाईला विचारलं तों मेल्या एका कॉलेजच्या पोरानच मध्यें तोंड घातलं! 'बाई, तुम्ही कुठनं आलांत? टांगा कां नाहीं केलात? चला, मी येतों घर दाखवायला' म्हणून चवकशी

करूं लागला; आणि मी जो उत्तर देण्याचा प्रयत्न करतें आहे तों स्वारीनं आपलीच माहिती करून देण्याचा सपाटा चालविला! ' म्हणे माझं नांव दिलरुबा. माझं अद्याप लग्न व्हायचं.' ती चर्पट-पंजरी बंद करण्याकरितां मी मध्येंच सांगितलं की वसंतराव काळे यांच्याइथं मला जायचंय. तो मेला नकली हंसत म्हणतो, ' हो, त्याच्या म्हणजे आमच्याच घरीं यायचंय तुम्हांला!' पांचट मेला! त्याला दिला तसाच पिटाळून—पण आतां घर कसं सांपडणार मला? टांगा करून आले असतें तरी बरं झालं असत!

( शाळिग्राम प्रवेश करतो. )

**शाळिग्रामः**—( स्वगत ) दिवाळीसारखा जंगी सण—लग्नानंतरची ही पहिलीच दिवाळी—बायकोचं माहेरीं काय होतं? पण वडिलांनीच आमच्या बायकोची माहेरी रवानगी करण्याचं ठरविल्यानंतर बोलायच काय पुढं? बरं, सासुरवाडीसहि कांही अडचण आल्यामुळं आमचे सासरे दिवाळसणही—पुढं केव्हां तरी देणार आहेत! घरांतून बायको गेल्यानंतर ' गृहंतु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते!' वसंताचंही पत्र आलं इतक्यांत ' दिवाळीला इकडे ये' म्हणून घरची दिवाळी टाकून—घराबाहेर पडलो—पण आतां विचार पडला आहे कीं वसंताला थाप काय मारावी? ( नर्मदेकडे पाहून ) अरेच्या, ही कुठं इकडे! आता थाप काय मारणार, कपाळ? बरं झालं, वाटेंतच गांठ पडली म्हणून अगोदर कांहीं तरी पढवितां येईल! ( उघड ) अहो, बाईसाहेब, आपण कुठं इकडे?

**नर्मदाः**—हा बाई कोण मेला खवीस आणखी?

**शाळिग्रामः**—ए सटवे! तूं कुठं इकडे?

**नर्मदाः**—इश्य, कोण आपण ? आणि इकडे कुठं या वेळी ? इश्य, आपणच का ?

**शाळिग्रामः**—होय, मीच ! पण तूं कुठं इकडे ! दगा दिलास ना चांडाळणी माझ्या कल्पनेला ! आपली धिडका माहेरीं निघून गेल्यामुळं दिवाळीचे चार दिवस मजेत घालवायला म्हणून या वसंतराव काळ्यांकडे आलो तो तुझीही धिडका इकडेच ?

**नर्मदाः**—कुणाकडे, वसंतराव काळ्यांकडे का जायचंय आपल्याला ? अगबाई, मग मलाही तिथंच जायचं आहे की ! त्याची बायको वासती ही माझी कॉलेजांतली मैत्रीण—तिनं मला दिवाळीचे चार दिवस—

**शाळिग्रामः**—अग पण हो—

**नर्मदाः**—पण—पण काय हो, असे अकाळविकाळ ओरडतां काय एखाद्या राक्षसपार्ट्यासारखे ? अऽ ! आणि मेलं कांही लाज, भीड, मर्यादा—परक्या ठिकाणीं—रस्त्यांत अगदीं अचानक, अकल्पित भेट झालेली, तरी बेधडक चांडाळणी, सटवे म्हणून हाक मारताय ! एखाद्यानं हें जर ऐकलं तर त्याला वाटेल आपला आणि माझा कांही तरी भलताच संबंध आहे म्हणून ! केवळ आपली लग्नाची बायको पडलें म्हणून हें ऐकून घेणं भाग झालं मला ! इश्य, अगदीं हे आहांत !

**शाळिग्रामः**—आहे हा असा आहे ! अग, तुझं माझं काय 'लव्ह मॅरेज' झालंय म्हणून प्रेमाची नाजूक साजूक भाषा बोलूं तुझ्याजवळ ? 'लाडके, प्रिये, अगबाई, इश्यबाई—अगदीं लचकत, मुरडत'—त्यांत कांहीं नाहीं, सगळा मिळमिळीतपणा ! पण 'चांडाळणी' 'सटवे' तसंच 'चांडाळ' 'खवीस' एक प्रकारचा कणखरपणा आहे त्यांत ! तुझ्या गांठीभेटीचा आतांचा योगायोग अगदीं

नाटकी थाटाचा जमून आला आहे; आणि बहुतेक आपल्याला नाटक करावं लागणारच आतां ! कारण हा वसंत माझ्या कॉलेजांतला मित्र ! कॉलेजांत ठरलं होतं आमचं, करायचं तर लव्ह-मॅरेज करायचं म्हणून ! पण प्रेमाचा परमेश्वर एकट्या वसंतालाच पावला आणि दर्शन घडतांच प्रेम बसण्याचा योगायोग आमच्या नशिबीं केव्हा आला ?

[ राग—भूप, ताल—त्रिताल ]

**मधुर रुचिर वदना, सुगात्री ।**
**सुंदर वसना कुसुमहार करिं ।**
**जशी काय शचि, दिसेल मज जणुं ॥ धृ० ॥**
**शुभमंगल सावधान समयीं ।**
**सावध, जों मी पाहे विस्मयिं**
**अंतःपट परि दूर होउनी ।**
**दिसली नयना हीच सुरामा ॥ १ ॥**

काय, आणि भटजींनी शुभमंगल सावधान म्हटल्यानंतर जेव्हां अंतरपाट बाजूला गेला तेव्हां ही सौंदर्याची पुतळी नजरेसमोर पहाण्याचं नशीबी !

**नर्मदाः**—मग काय फसल्यासारखं वाटलं कीं काय आपल्याला ?

**शाळिग्रामः**—काय सांगूं आतां ! पदरीं पडलं आणि पवित्र झालं ! वाटलं, आमच्या प्रेमाच्या, सौंदर्याच्या, रोमान्सच्या कल्पना ज्या रानोमाळ नाचत बागडत फिरत होत्या, त्या फिरत्या चक्राची गती थांबविणारा हा ब्रेक, आमच्या प्रेमाच्या वाक्याचा हा पूर्ण-विराम ! ज्या सौंदर्याच्या नांवानं आम्ही ओरडत होतों तें हेंच का, म्हणून डोळ्यांसमोर उभं राहिलेलं हें प्रश्नचिन्ह ! आणि हेंच

तें सौंदर्य अशी खात्री होतांच उचकी लागल्यामुळं तोंडांतून बाहेर पडणारीं उद्गारचिन्हं ! आणि--

**नर्मदाः**--पुरे, पुरे बरं का ! आणि त्याच वेळीं आपल्याकडे पाहून मला काय वाटलं असेल हो ? सांगूं का आता ?

**शाळिग्रामः**--काय, काय वाटलं तुला ?

**नर्मदाः**--चला, काहीं नाहीं वाटलं मला ! यांतच समजा काय तें !

**शाळिग्रामः**--आणि मला हं स्वप्नच पडलं होतं ! आमचा प्रेमविवाह होणं कांही शक्य नाही ! कारण आमचं नावच नाही मुळीं प्रेमविवाहाला अनुकूल ! शाळिग्राम ! या दगडाला का प्रेमाचा पाझर फुटायचाय ! आणि बायकोचं नांव नर्मदा ! बाकी दोन्ही नांवं कशी खमंग, खरखरीत आणि ठणखणीत आहेत ! एक नर्मदा आणि दुसरा शाळिग्राम !

**नर्मदाः**--बर, चला की आतां ! पुरे झाल्या आतां आपल्या प्रेमाच्या आणि लग्नाच्या कहाण्या ! बरं झालं बाई आपली गांठ पडली म्हणून, नाहीं तर इथं हे चार दिवस मला कसं अगदीं एकटं एकटं वाटलं असतं !

**शाळिग्रामः**--अरे हो ! मुख्य सांगायचं विसरलो ! वसंताच्या आणि आमच्या ' लव्ह-मॅरेज ' करण्याबद्दल कॉलेजांत शपथा झाल्या होत्या हं सांगितलंच मगाशीं तुला ! आपलं लग्न कसं झालं हें तुला माहीत आहेच. तेव्हां माझं लग्न झाल्याचं मी त्याला अद्याप कळविलेलं नाहीं ! आपल्याला दोघांनाहि जायच आहे एका ठिकाणीं. तुझा काय विचार असेल तो तूं आपला पाहून घे पण मी मात्र आतां अविवाहित ब्रह्मचारी आहें ! काय समजलीस ?

**नर्मदा:**—हं, आहांत खरेच अविवाहित ब्रह्मचारी ! आणि तसा कुणी संशय घेतलाच आपल्याबद्दल तर मी आहें ना साक्षीला ! मलाहि बाई कोडंच येऊन पडलंय ! वासंती ही माझी वर्गातली मैत्रीण ! आमचं पण ठरलं होतं वर्गात, करायचा तर प्रीतिविवाह करायचा म्हणून ! पण माहीतच आहे कडे पत्रिका ठरूनच आपलं लग्न झालं तें ! काय करावं बाई, माझ्यापुढहि मोठा प्रश्न आहे !

**शालिग्राम:**—हात्त्याच्या ! मग गोपा उपाय आहे त्याला ! वासंतीला साग तुझंही लग्न अजून झालं नाहीं म्हणून !

**नर्मदा:**—काय, लग्न झालं नाही म्हणून सांगं ! आणि गळ्यांतलं मंगळसूत्र ?

**शालिग्राम:**—टाक पोलक्याखाली लपवून !

**नर्मदा:**—हो, तुमच्या पुरुषाचं पुरे—तुम्ही म्हणजे अगदीं बंधनाच्या पलीकडे ! तुमची थाप सहज चालेल ! तुम्हांला आहे का कांहीं मंगळसूत्राची वगैरे अडचण !

**शालिग्राम:**—हें बघ, इथले चार दिवस निभावून गेले म्हणजे मग आपण आपल्या घरीं गेल्यावर करूं पाहिजे ती सुधारणा ! मग तुम्हांला अगदीं तितकाच हेवा वाटायला लागला तर मग बांधा आमच्या गळ्यांत मंगळसूत्र ! आमची ना नाहीं ! मग काय, ठरलं ना दोघांनींही आपलीं लग्नं झाल्याचं नाकबूल करायचं हें !

**नर्मदा:**—मला बाई कसंसंच वाटतं !

**शालिग्राम:**—हं ! हें मी केव्हांच ओळखलंय ! तुझ्यांत रोमान्सच नाहीं मुळीं ! अग असं पहा, समज आपली ही थापबाजी उघडकीला आली यदाकदाचित्, तरी आपली अशी काय फारशी फजिती व्हायची आहे ? आपण नवरा-बायको आहोंतच मुळीं पहिल्यापासून ! साधलं तर करूं या थोडंसं रोमान्सचं नाटक !

बोलूनचालून गाजराची पुंगी. वाजली तर वाजली नाही तर मोडून खाल्ली !

**नर्मदाः**—पण ही उलटीकडून सुरुवात होतीय ती ! रोमान्सचा परिणाम म्हणून जें लग्न व्हायचं ते लग्नानंतर रोमान्सला सुरुवात होतीय आपली !

**शाळिग्रामः**—अग, रोमान्सच्यामागं लागलेलं जग वेडं आहे सगळं ! लग्नानंतरच खरा रोमान्स असतो !

**नर्मदाः**—आपण म्हणाल तें खरं ! पण पहा बाई, पुरता विचार करा काय तो—आपण सांगाल त्याला मी कबूल आहें !

**शाळिग्रामः**—आहे, आहे. झाली कांही तरी तुझ्यांत थोडीशी सुधारणा ! बरं, तूं हो पुढं, मी येतों पाठीमागून ! पण सावध हं ! नाहीं तर बोलतांना चांचरशील एखाद्या वेळी !

**नर्मदाः**—आपणच सांभाळून असा ! हो, पण आपण आपली एकमेकांची ओळख आहे असंसुद्धां दाखवायचं नाहीं हं !

**शाळिग्रामः**—हे काय सांगायला पाहिजे वाटतं मला ! नाहीं तर तूंच म्हण एखाद्या वेळीं 'तिकडे' काय तें विचारा: किं लगेच 'इकडे' माझा घोंटाळा !

**नर्मदाः**—चला तर मग, पण हो, त्यांचं घर कुठंशी आहे ?

**शाळिग्रामः**—हें बघ इथून हें दुसरंच !

( नर्मदा जाऊं लागते व पुनः परतते. )

**नर्मदाः**—ऐकलं का ? एक गंमत सांगूं का आपल्याला ?

**शाळिग्रामः**—एक ! अग इथून पुढं गंमतीच गंमती ! बरं, तुझी तर गंमत ऐकूं दे !

**नर्मदाः**—रागवायचं नाहीं हं पण—

**शाळिग्रामः**—छट् !

**नर्मदाः**—आपण प्रेमविवाहाला नालायक होतां हें आतांच सिद्ध झालं !

**शाळिग्रामः**—तें कस काय ?

**नर्मदाः**—कसं म्हणजे असं, अचानक लग्नाची बायको पुढं आल्याबरोबर अगदी एखाद्या पूर्ण सनातन्याप्रमाणं 'चांडाळणी' 'सटवे' या विशेषणांनी आपण माझी पूजा केलीच की नाहीं ? मी बाई आतांपर्यंत प्रेमाच्या इतक्या कादंबऱ्या आणि नाटकं वाचली पण प्रियतमेला 'चांडाळणी' 'सटवे' या विशेषणाचा केलेला आहेर मला अद्याप कुठंच पाहायला मिळाला नाहीं ! बराय, जातें म्हटलं !

**शाळिग्रामः**—आणि तूं जी आतां माझी पायपूजा केलीस ती तरी कोणच्या नाटक-कादंबरींत आहे ? 'चांडाळणी, सटवे' हा विशेषणांचा जुना कोश आहे ! हल्लीं त्याचं भाषान्तर करून वापरतात, येवढाच फरक ! अर्थ तोच, फक्त शब्द आणि शब्द वापरणारीं माणसं बदललीं, येवढाच फरक ! नीट लक्षांत ठेव 'चांडाळणी' म्हणजे 'प्राणप्रिये' आणि 'सटवे' म्हणजे 'हृदयवल्लभे'—काय समजलीस ?

**नर्मदाः**—मग असं करा, नवीन शब्दकोशच वापरा आपण इथून पुढं ?

**शाळिग्रामः**—बराय, इथून पुढं लाडके, प्रिये, प्रियतमे, मममानस चित्तचकोर चंद्रिके, नर्मदे वगैरे वगैरे—वगैरे !

**नर्मदाः**—हं, असंच पाठान्तर करा कांहीं वेळ, म्हणजे जीभ वळली तर वळेल थोडीशी !

**शाळिग्रामः**—त्याची नको आतां तुला काळजी ! मी



**वसंतः**—आणि आमच्या दिग्विजयाचा हा जरिपटका! (पृ. १४)

आपल्या जिभेला आतांच हाडं बसवून घेतलीं आहेत तुझ्या टीकेची! बरं, जा आतां!

**नर्मदाः**--बराय, ओळखदेख ठेवायची म्हटलं--नव्हे नव्हे--विसरायची 'येतें हं' (जाते.)

**शालिग्रामः**--या हं 'शाबास' आता पाहुं या आमची ही काही घोटाळा करते आहे की खरच कांहीं रोमान्स करते आहे! बाकी तिचीआमची पहिली सलामी तर मोठी रोमॅंटिक झाली बुवा! एकूण आमची रोमान्सची हौस पुरणार म्हणायची!

[ राग--सोरट, ताल--त्रिताल ]

**प्रणयलीला रंगी। करि अवगाहन मम मनहंस ॥ धृ०॥**
**लीलावती मम कान्ता पुरविल।**
**वाटे खचितचि आस ॥ १ ॥**

---

## प्रवेश दुसरा

( स्थळ--वसंताचा दिवाणखाना.)

**वसंतः**--एकूण या पत्रावरून शालिग्राम आज-उद्यां इतक्यांत इथं येऊन थडकणार. वास्तविक शालिग्रामच्या आणि आमच्या वारंवार गांठी भेटी झाल्या--एका बैठकींतले आम्ही--बरेच दिवस एकमेकांपासून दूरही होतों--पण आजच्या या पुनर्भेटीच्या वेळी मनाला जी एक अलौकिक उतावीळ वाटते आहे त्याची मजा कांहीं औरच आहे! कशामुळं असेल बरं हें!

[ राग---तिलककामोद ताल---झपताल ]

**सौख्य बहु मज होत। अजि हा सुदिन येत॥**
**प्रिय मित्र ये आज। मोहन खचित यात॥ धृ०॥**
**हृदिं मोद ना ठरत। चैतन्य नच येत।**
**या कारण वियोग?। आमोद कीं अमित॥ १॥**

माझ्या विवाहानंतर त्याची माझी ही पहिलीच भेट, म्हणून हे असं असेल का? कांहीं कांहीं वेळां होणारी मनाची फसवणूक मोठी मोहक असते! लग्न झाल्यानंतर स्वतःबद्दल जरा जास्त मोठे-पणा वाटायला लागतो---जसा कांहीं आपण एखादा अलौकिक दिग्विजयच गाजविला आहे! (वासंती येते.) आणि आमच्या दिग्विजयाचा हा जरिपटका! काय, वासंती, आज फारशी आनंदांत दिसते आहेस?

**वासंतीः**—आंब्याला मोहोर आला कीं जसं आजूबाजूचं वातावरण सुगंधित होतं त्याप्रमाणं आपल्या कल्पनेला मोहोर आल्यासारखं झालं आहे बाई!

**वसंतः**—काय, पत्राचं उत्तर आलं वाटतं तुझ्या मैत्रिणीकडून? शाळिग्रामाचंहि पत्र आलं आहे! पण हें पाहिलंस का, शिकलेले असोत, बिनशिकलेले असोत, आपल्या लोकांना एटिकेटस्‌च नाहींत मुळीं! पाहिलंस, अगदीं सिंगल नव्हे डबल ग्रॅज्युएट आहे! पण पत्रांत नुसतं 'आपल्या पत्राप्रमाणें अगत्य येतों' एवढाच मजकूर! कोणत्या गाडीनं येतों हें कळवलं असतं तर रिसिव्ह करायला गेलों नसतों आपण त्याला स्टेशनवर? बरं का वासंती, कॉलेजमध्यें असल्यापासून मी याचं पाहून ठेवलंय, बुद्धीनं चपळ पण वागण्यांत निव्वळ अजागळ!

**वासंतीः**—आणि हें पहा आमच्या नर्मदाताईचं पत्र! त्यांतल्याहि मजकुराचा मासला तोच! हिचीसुद्धां कावळी नजर आणि बावळी वागणूक! तुमच्या भाषेंत म्हणायचं म्हणजे अजागळच म्हणानात!

**वसंतः**—हो, दोघंहि बहुतेक आजच येतील. कां, पण आपण दिवाळीच्या सुट्टींतला प्रोग्राम तर ठीक ठरविला कीं नाही? म्हटलं आपण दोघंहि प्रौढ, तेव्हां आपल्याला कांहीं दिवाळींत फटाकडे, फुलबाजा उडवतां यायच्या नाहींत! तेव्हां म्हटलं तुझी एक मैत्रीण, माझा एक मित्र, तुझा भाऊ दिलरुबा आहेच जोडीला! जमूं या एकत्र आणि चार दिवस उडवूं या विनोदाचे फटाकडे आणि हास्याच्या फुलबाजा!

**वासंतीः**—पण बाई, मला आमच्या भाऊची किनई आतांशा काळजी वाटायला लागली आहे! लग्न कांहीं इतक्यांत करायचं नाहीं म्हणतो आणि लग्नाचे मुहूर्त जवळ आलं कीं लागतो भ्रमिष्टासारखं बोलायला! नाहीं तर माझा भाऊ बुद्धीचा वाईट का आहे, पण अगदीं छांदिष्ट!

**वसंतः**—अग त्याचंच काय, सगळ्याच लग्न न झालेल्या पोरांचं हें असं आहे! त्यांना कळत नाहीं, कॉलेजांत कालिदास, भवभूती यांच्यासारखे वाग्भट काव्यसुधेचे पेले पाजीत असतात. अशा स्थितींत लग्न झालेलं असलं म्हणजे बरं—नाहीं तर शरीरावर परिणाम होतो म्हणतात! हं, तें काय आहे तुझ्या हातांत? कोणच्या तरी मासिकाचा दिपोत्सव अंक दिसतोय, पाहूं या काय दिवे पाजळले आहेत ते!

**वासंतीः**—गृहदेवता या स्त्रियांनींच चालविलेल्या मासिकाचा दिपोत्सव अंक आहे हा. पहावा पाहिजे तर.

**वसंतः**—(अंक पहात) अरेच्या, याच्याही मुखपृष्ठावर सुंदर स्त्रीचंच चित्र ! पुरुषांनीं चालविलेल्या बहुतेक मासिकांवर स्त्रियांचीं व स्त्रीनटांचीं चित्रं प्रामुख्यानं दिसतात. तेव्हां माझ्या मनांत अशी विनोदी कल्पना आली होती कीं पुढंमागं स्त्रियांनीं जर कांहीं मासिकं चालविलीं तर त्यांच्या मुखपृष्ठावर सुंदर सुंदर पुरुषांचे फोटो येतील ! पण हा अंक पाहून जिरलों बुवा आपण !

**वासंतीः**—कांहीं तरीच कल्पना करायच्या, मग कां नाही असं व्हायचं ! नाहीं तरी म्हटलं स्त्रियाच जास्त सुंदर असतात

[ राग—यमन, ताल—त्रिताल ]

**नारी सुंदरा विलोका। निर्मुनि नटवित विधि वसुंधरा।**
**॥ ध्रु० ॥**
**चंडकिरण रवि ताप दे खरा। मोदयुता परि चंद्रिका**
**नरा ॥ १ ॥**

**वसंतः**—अग भ्रम आहे नुसता हा ! पुरुष काय कमी सौंदर्य-वान् असतात ! मनुष्यांनीं आपलं स्त्रीला चढवून ठेवलंय, येवढंच ! पण कुठंहि पहा, पुरुषच जास्त सुंदर असतात—

[ राग—दुर्गा, ताल—एकताल]

**फोल बोल हा वदती। रमणि रुचिर या जगतीं ॥ध्रु०॥**
**पुरुषापरिसहि सुंदर। नच कधि ललना दिसती**
**नयनमनोहारि मयुर। खचित मयूरीपुढती ॥ १ ॥**

तसंच सिंह आणि सिंहीण—असतो कीं नाहीं भरपूर आयाळाचा सिंह रुबाबदार दिसायला ?

**वासंतीः**—आणखी म्हणा कीं, भरपूर आयाळवजा दाढी-मिशांचे पुरुष कुठं आणि हल्लींची पिढी कुठं ! मला वाटतं, पुरुष पुन्हां

दाढीमिशा वाढवायला लागले कीं स्त्रीसंपादक त्यांचे फोटो त्यांच्या मासिकांच्या मुखपृष्ठांवर छापतील ! आतां आपण काढा तसा एखादा प्रॉपोगँडा !

**वसंतः**---निरुत्तर केलंस बुवा ! आहे, बुद्धिबाज कोट्या करण्यांत झालीस पटाईत ! हो, पण काय ग वासंती, शाळिग्राम आजच यायचा म्हटलं तर आतां ही यायची वेळ आहे त्याची !

**वासंतीः**---खरंच का ? मग आली तर माझी मैत्रीणही येईल याच गाडीनं ?

**वसंतः**---बरं, पण आतां तीं दोघंही आलीं तर त्यांच्याकरितां फराळाचं वगैरे ठेवलं आहेस का कांहीं करून ?

**वासंतीः**---हो, आलींच तर फक्त चहा करावा लागेल--बाकी फराळाचं तयार आहे !

**वसंतः**---ठीक ! आपली एक गोष्ट सहज आठवली. माझ्या आईची आठवण आहे नी ! मजा वाटतो आईच्या प्रेमळपंखा-खालीं गेलेल्या दिवसांचा ! आईनं नेहमीं म्हणावं, " वसंताचं लग्न झाल्यावर वसंत बायकोला अगदीं तळहाताच्या फोडासारखा वागवील---तिला कुठं ठेऊं, कुठं न ठेऊं असं करील. आणि बहुतेक तिच्याकडचा स्वैंपाकसुद्धां काढून घेऊन---आणि अलिकडच्या या नटव्या पोरींना स्वैंपाक तरी कुठं येतो धड करायला ! तेव्हां आपला वसंत खाणावळींतून ताट आणून नवराबायको जेवतील दोघंही ! " आम्हीही त्या वेळीं लहानच ! आम्हांला त्या वेळीं आमची ' बायको ' असं नुसतं कुणी म्हटलं तरी कांहीं तरी कल्प-नेनं खुदकन् हंसायला येई ! गेले ते बाळपणचे दिवस ! आणि बिचारी आई आणि बाबाही आपले हे दिवस पाह्यला राहिले नाहींत ! कशावरनं बरं आठवलं हें बोलणं ? हं---तूं केलेल्या

फराळावरनं ! आतां वाटतं आईचे विनोदाचे बोल खरे व्हावेत म्हणून आपण खरोखरच खाणावळींतून ताटं आणून जेवूं एक दिवस !

**वासंतीः**—कां, पुन्हां बाळपण आठवलं वाटतं असल्या पोरचेष्टा करायला ?

**वसंतः**—हंसशील तूं, पण म्हणतात ना, स्वतःला पोर होईपर्यंत आपणही पोरच असतों म्हणून !

**वासंतीः**—पुरे झालीं बाई असलीं बोलणीं !

( एकीकडून शाळिग्राम आणि एकीकडून नर्मदा प्रवेश करते. )

**वसंतः**—ओ हो हो ! या शाळिग्रामपंत.

**वासंतीः**—ओ लो लो ! नर्मदे, आलीस !

**वसंतः**—अरे गृहस्था, अमक्या गाडीनं येतों म्हणून कळवायचं तरी होतस.

**वासंतीः**—गडे, कळवायचं तरी होतंस अगोदर अमक्या गाडीनं येणार म्हणून.

**शाळिग्रामः**—याही कोणी पाव्हण्या याच गाडीनं आल्या आहेत वाटतं ?

**वसंतः**—हो ! आमच्या हिची मैत्रीण आहे ती !

**शाळिग्रामः**—असं का ?

**वासंतीः**—पण काय ग नर्मदे—हं नर्मदाताई, बसा कीं आपणसुद्धां ! संकोचाचं कांहीं कारण नाहीं इथं—घरच्यासारखींच आहोंत आपण सगळीं ! पण काय ग, या बाजूनं कुठनं आलीस तूं ?

**नर्मदाः**—कुठनं म्हणजे—ओटीवर कुणीच दिसलं नाहीं म्हणून आलें ती स्वैपाकघरांत शिरलें ! पण तूं नव्हतीस तिथं—मला काय

माहीत इथं वर तुम्ही दोघंच बसलां आहांत तीं ! मी अंमळशानं वर आलें असतें !

**वासंती:**—अस्सं का ? बरीच सोंवळी आहेस म्हणायचीस एकंदरींत ! आणि बरं का नर्मदाताई—आमचाहि कांहीं—पाहिलंसच तूं म्हणा—

**नर्मदा:**—अस्सं का, मी बाई आपली सहज थट्टेनं बोललें कांहीं तरी !

**वसंत:**—हं, कसं काय शाळिग्राम, ठीक आहे सगळं ?

**शाळिग्राम:**—हवापाणी, गोठ्यांतलीं गुरं, घरचीं माणसं ठीक आहेत सगळीं ! तुझं कसं काय ?

**वसंत:**—माझं ठीक आहे ! काय नवीन मनुष्य आणलस कीं नाहींस अजून घरांत ? काय ?

**शाळिग्राम:**—हो ! आमच्या घरांत माणसांची वर्दळ फार ! रोज नवी नवीं येतात आणि जुनीं जुनीं जातात ! सारखी ये जा चालू आहे ! वडिलांचं हॉस्पिटलच आहे मुळीं रोग्यांचं घरांत—मग माणसांना काय तोटा ?

**वसंत:**—तसं नव्हे रे, लग्न वगैरे केलंस कीं नाहीं अजून ?

**शाळिग्राम:**—अस्सं होय ? नाहीं. गेल्या वर्षी मुहूर्तच लाभला नाहीं कोणचा ! हं !

**वसंत:**—कां, एवढा लांबसा सुस्कारा ?

**शाळिग्राम:**—नाहीं रे, असं वाटतं संन्यास घ्यावा ! कंटाळलों बुवा या एकट्या आयुष्याला ! **जाते घडी ही आपुली साधा—**

**वसंत:**—कां, म्हटल्या घडीला लग्न जमत नाहीं म्हणून कीं काय ? आपल्याकडे दे कॉंट्रॅक्ट ! आपण जमवतों तुझं लग्न ! हं,

पण भलतंच मात्र कांहीं करूं नकोस हं, लग्न जमत नाहीं म्हणून ! नाहीं तर हो पक्का सुधारक, कर पुनर्विवाह नाहीं तर मिश्रविवाह—

**शाळिग्रामः**—थट्टा करूं नकोस. मी खरंच मिश्रविवाह करणार आहें !

**वसंतः**—म्हणजे ? वडिलांना कबूल आहे का हें ?

**शाळिग्रामः**—हो, त्यांच्या संमतीनंच करणार आहें ! आईचीही त्याला कबुली आहे !

**वासंतीः**—खरंच का ? का कांहीं तरीच ?

**नर्मदाः**—कोण, आपण का करणार मिश्रविवाह ?

**वसंतः**—हं चल बाहेर हो तर मग आधीं—आतांच्या आतां—झाला येवढा पाहुणचार पुरे झाला !

**शाळिग्रामः**—खरंच कीं काय ! आणि राजश्री, आपण काय केलंस ?

**वसंतः**—काय, आम्हीं मिश्रविवाह केला ?

**शाळिग्रामः**—नाहीं तर काय केलंस ? स्त्री आणि पुरुष विवाह म्हणजे दोन जातींतील मिश्रविवाह नव्हे वाटतं ?

**वसंतः**—अस्सं काय ! खरंच, अजब शोध आहे आपला !

**वासंतीः**—काय ग नर्मदे, तुझ्याही लग्नाचं अजून नाहीं वाटतं जमलं कांहीं ! बाकी तूं कशाला सांगायला हवंस म्हणा, लग्न ठरलं असतं तर आम्हाला नसतंस का बोलावलंस तूं ?

**नर्मदाः**—हो ! ( एकीकडे पहात बसते. )

**वासंतीः**—ऐकलं का, मला बाई आतांच एक कल्पना सुचली आहे—दाखवूं का बोलून ?

**वसंतः**—अरे हो शाळिग्राम, तूं कांहीं आमच्या लग्नाला आला नाहींस ! तेव्हां ओळख करून देतों तुझी—ह्या आमच्या ह्या !—

**शाळिग्रामः**—कळलं मला.

**नर्मदाः**—( वासंतीस एकीकडे ) आतां तू मला सांगणार कीं काय, हे आमचे हे म्हणून !

**वासंतीः**—बरीच कीं ग वात्रट बनली आहेस ! काय, सांगूं का मी आपली कल्पना ?

**वसंतः**—काय शाळिग्राम, ऐकायची आहे का ?

**शाळिग्रामः**—हूं !

**वासंतीः**—मला वाटतं दिवाळीचे दिवस आहेत हे—

**वसंतः**—वाटायला नको, खरंच आहेत—

**वासंतीः**—यांच्यादेखत असलीं अडवाअडवीचीं बोलणीं बोलूं नयेत गडे !

**वसंतः**—( शाळिग्रामास ) काय रे, ऐकलंस का ?

**शाळिग्रामः**—तुझ्या प्रत्येक प्रश्नाला माझा हुंकार आहे असं धरून चाल तूं !

**वासंतीः**—इथं बोलण्यांत—आतां खोखोचा डाव चालेल नुसता ! तेव्हां मी एका वाक्यांत सरळ सांगतें मला काय वाटतं तें ! ही आमची नर्मदा आणि आपले मित्र हे शाळिग्रामपंत अगदीं योग्य जोडी आहे एकमेकांना—मला वाटतं आपण यांचं लग्न जमवून द्यावं ! मुहूर्त आहेतच पुढच्या महिन्यांत !

**वसंतः**—पाहिलंस, बायकोची जात ! लागली लग्न जुळवायला ! बाकी असं कुणी केलं तर तुला हवंच आहे म्हणा ! काय रे ?

**शाळिग्रामः**—थांब, सांगतों विचार करून !

**वासंतीः**—नर्मदाताई, हं लाजूं नका ! ही घाई होते आहे—पण 'सूतऽउवाच' एवढंच आतां करून ठेवतें. मला वाटतं हीं

दोघंही इथं आतां आहेतच चार दिवस, तेव्हां तोंपर्यंत जमेल हें! आपण यांना मोकळीक मात्र लाभूं दिली पाहिजे!

**नर्मदा:**—( शाळिग्रामकडे चोरून पहात ) वासंती, तूं लागलीस हं एकेक पाऊल पुढं टाकायला! उगीच आपले मनांत नसते मांडे खायला नकोत कुणी! बरं का वासंती, आपण ठरवलं होतं 'लव्ह मॅरेज' करायचं म्हणून, पण तूं बाई भाग्यवान या बाबतींत!

**वासंती:**—आणि तूं?

**नर्मदा:**—अग, मला माझ्या वडिलांचं ऐकायला पाहिजे!

**वासंती:**—आम्ही काढूं तुझ्या वडिलांची समजूत.

**नर्मदा:**—अग, तूं काय समजूत काढणार! माझे बाबा म्हणजे नुसता जमदग्नीचा अवतार!

**वासंती:**—मग काय, त्यांनीं ठरवलं आहे कीं काय तुझ्या लग्नाचं कांहीं?

**नर्मदा:**—हो, तीच तर पंचाईत येऊन पडलीय! त्यांचे आपले जुने डोळे, त्यांनीं कुठला एक पैसेवाला शामभट खवीस पाहून ठेवलाय, आणि मला म्हणतात कीं कर लग्न याच्याशीं!

**शाळिग्राम:**—( स्वगत ) लागले रोमान्सचे फटाकडे उडायला! ठरलों आम्ही शामभट!

**वासंती:**—अगबाई, मग?

**नर्मदा:**—मग काय, पुढं काय होईल तें पाह्यचं! म्हणून म्हणतें भलतंच कांहीं बोलूं नकोस!

**वसंत:**—हं काय शाळिग्राम, तूं कसल्या विचारांत पडला आहेस? का इतक्यांतल्या इतक्यांत आशा दिसली आणि लगेच निराशा झाली म्हणून हताश झालास असा?

**शाळिग्राम**ः—अरे मला आशाच नाहीं तर निराश कसला होतों मी ?

**वसंत**ः—कां ?

**शाळिग्राम**ः—माझहि तसंच ! आमचे काका म्हणजे परशुरामाचा बाप दुसरा ! त्यांनींहि अशीच एक बापाला एकुलती एक असलेली हडळ माझ्याकरितां ठरवून ठेविली आहे—काय करणार आतां ?

**वसंत**ः—एक उपाय आहे त्याला !

**वासंती**ः—काय तो सांगायचा होता, आपण करूं कांहीं तरी खटपट !

**वसंत**ः—असं कर, तूं आपल्या मैत्रिणीकडून त्या कोण ठरविलेल्या शामभटजीचा पत्ता घे काढून, आणि 'यू' ए बिग फूल, तुझ्या त्या हडळीचा पत्ता दे मला. म्हणजे कोणाच्या तरी मध्यस्थीनं तुम्हां दोघांमध्यें येऊं पहाणारे हे दोन फॅक्टर्स बांधूं आपण एकमेकांच्या गळ्यांत ! कीं तुम्ही दोघे मोकळेच !

**शाळिग्राम**ः—शाबास, सुंदर कल्पना !

**वासंती**ः—हं नर्मदे, तुझा काय विचार ?

**नर्मदा**ः—पहा बाई कांहीं जमलं तर तुमच्याच्यानं—

( वासंतीचा भाऊ दिलरुबा गात गात प्रवेश करतो. )

**दिलरुबा**ः—पुन्हां मरावें–पुन्हां जगावें, परि पाहिलें...घ्यावें.! ओऽ! सम गेस्टस् ! (स्वगत) अरे मगाशीं स्टेशनच्या रस्त्यावर भेटली ती हीच !

**नर्मदा**ः—( स्वगत ) अग बाई, हाच तो रस्त्यांत भेटलेला फटिंग ! त्या वेळेला खरंच बोलला म्हणायचं ! काय ग बाई ध्यान

तरी ! आणि बोलायला लागला कीं अकलेची फुलबाजी उडते जशी !

**वासंतीः**—काय रे कुठं गेला होतास इतका वेळ ?

**दिलरुबाः**—सहज कॉलेज-साइडच्या हिलवर गेलों होतों फिरायला.

**वासंतीः**—बरं का भाऊ, आपले पाहुणे आले. हींच तीं दोघं.

**दिलरुबाः**—नांवं नाहीं सांगितलीस ताई यांचीं !

**वासंतीः**—यांचं नांव शाळिग्रामपंत, आणि ही नर्मदा माझी मैत्रीण.

**दिलरुबाः**—आणखी यांची कांहीं विशेष माहिती ?

**वसंतः**—दोघंही दुर्दैवी अविवाहित !

**दिलरुबाः**—दुर्दैवी कशानं—आमचंही लग्न अजून व्हायचं आहेच कीं !

**वासंतीः**—हो खरंच, पण भाऊचं अजून शिक्षण पुरं व्हायचंय. नाहीं तर मी आपलं घरोब्यानं म्हटलं असतं नर्मदेला कीं हो माझी वहिनी म्हणून !

**शाळिग्रामः**—( स्वगत ) ओ, गुड लक् ! वा, छान ! काय शंख करूं का आतां ?

**दिलरुबाः**—बाकी शिक्षणाचं काय म्हणा, लग्न केलं म्हणून कांहीं शिक्षण अपुरं रहात नाहीं आतां !

**वासंतीः**—बरं चला, चहा करतें आतां अगोदर. चल, नर्मदे चल, आपण आंतच बसूं आतां जरा. (जातां जातां) आलोंच हं आम्ही चहा घेऊन.

**दिलरुबाः**—काय, चहा घेऊन येतां आणि तुम्ही आल्यावर चहाचीं भांडीं विसळायला जाऊं का काय आम्ही करांत ?

**वासंतीः**—भाऊ, प्रत्येक वेळेला कोट्या करूं नयेत! कांहीं वेळा गंभीर असण्याच्या असतात.

**दिलरुबाः**—बराय ताईसाहेब! (वासंती व नर्मदा जातात.) बाकी वसंतराव, मुलगी बरीच धीट दिसते नव्हे! आय् लाइक सच् गर्ल्स्! अशा मुली मला आवडतात; नाहीं तर कोणी परका आला रे आला कीं ओढला पदर अन् घातली मान खालीं. जणुं लाजाळूचीं झाडंच! बाकी शाळिग्रामपंत; आश्चर्य मानूं नका, मी या बाबतींत फार मोकळ्या मनानं बोलतों! वसंतराव, या मुलीशी आपण अगदीं आनंदानं लग्न करायला तयार होऊं!

**ते प्यारे एकच बोल। पुन्हां, ते बोल। बोल ते फिरुनी।**
**—एकदां ऐकवा कानीं॥**

**शाळिग्रामः**—(स्वगत) देऊं का याच्या आतांच कानशि-लांत भडकाऊन? पण त्या बिचाऱ्याकडे तरी काय चूक आहे? काय गंमत आहे! (शीळ घालीत बसतो.)

**वसंतः**—हं भाउसाहेब, जरा दमानं घ्या. तीही आतांच आली आहे. तुमची तिची ही पहिलीच दृष्टिभेट! आपले चार समवयस्क भेटलों म्हणून इतक्या मोकळ्या मनानं सहज बोलला. भलताच अर्थ घेऊं नका त्याचा!

**दिलरुबाः**—हं हं हं! तसं कांहीं सीरियसली बोललोंच नाहीं मी!

**नव्हती अगदीं इंदुसारखी। रूपाच्या मी नव्हेच शोकी**
**उरलो वेडा मजला लोकीं। कुणास ठाउक कशा रितीनें**
**तिच्याच गेलों मोहून॥**

**शाळिग्राम:**—( वसंतास ) काय रे, अगदीं जिव्हारी वार बसलेला दिसतो आहे गृहस्थाच्या !

**वसंत:**—( शाळिग्रामास ) खुळचट आहे झालं ! बरं भाउ-साहेब, चहा झाला का पाहून येतां का जरा ?

**दिलरुबा:**—ओ यस् ! जरूर. बाकी शाळिग्रामपंत, आपल्या मनांत जर या मुलीशीं लग्न करायचं असेल तर माझं कांहीं एक म्हणणं नाहीं हं ! लव्ह-मॅरेजबद्दलचे विचार माझ्या डोक्यांत धुमा-कूळ घालताहेत हल्लीं ! पण छट् ! आपला कोर्स कंप्लीट झाल्याशिवाय आपल्याला लग्न कर्तव्य नाही !

**शाळिग्राम:**—आणि शिवाय तुम्हाला बायकोही कोर्स कंप्लीट झालेलीच पाहिजे असेल ?

**दिलरुबा:**—हो, तसंच म्हणानात ! अहो तेवढयाकरितां दिवा-ळीच्या सुट्टींत घरींसुद्धां गेलों नाहीं तो ! म्हटलं घरीं जा, आणि वडिलांनीं तेवढयांत ठेवली असली एखादी मुलीची घोरपड धरून तर—

**शाळिग्राम:**—तर हा सिंहगड सर व्हायचा म्हणतां एकंदरींत ?

**दिलरुबा:**—हॉऽ ! बरं, चहा झाला का पाहून येतों अगोदर !

( जातो.)

**वसंत:**—काय शाळिग्राम—

**शाळिग्राम:**—कांहीं नाहीं, ठीक आहे !

**वसंत:**—ये, बस कीं असा इकडे.

**शाळिग्राम:**—नाहीं, इथंच बराय कीं !

**वसंत:**—बरं. (आपणच त्याच्याजवळ जाऊन बसतो.) का रे असा खिन्न का ? त्या मुलीदेखत लग्नाची गोष्ट काढली म्हणून

होय ? का आमची वासंती कांहीं बोलली, तें अमर्यादपणाचं वाटलं तुला ? पण खरं सांगूं मित्रा तुला--वडील माणसांचा कुणाचाहि धाक नाहीं आमच्या वागणुकीवर. तेव्हां बोलण्याचा व वागणुकीचा आम्हां दोघांनाहि कांहीं पाचपोंच राहिला नाहीं! तुला वैषम्य वाटत असेल आम्ही नवराबायको अगदीं बहिणभावंडांसारखी खेळीमेळीनं वागतों त्याचं! काय ?

**शाळिग्रामः**—कांहीं नाहीं! गंमत पहातों आहे मी तुम्हा नवराबायकोंची; आणि गेला तो हुप्या वानर कोण--आपल्या कुटुंबाचा भाऊ वाटतं ?

**वसंतः**--कां, त्याबद्दलशी फाजील चौकशी ?

**शाळिग्रामः**--मग सांगेन याचं उत्तर! पण काय रे वसंत, मी घरीं आईचं आणि काकांचं मन मोडून दिवाळींत इकडे आलों त्याचं मुख्य कारण—तुमच्या लग्नाला वर्ष होत आलं, नव्हे—हं, तेव्हां एकदर तुझी परीक्षा चुकली की बरोबर आहे? अर्धांग अगदीं मनासारखं आहे ना ?

**वसंतः**—काय मारू प्रश्न विचारलास! मीहि याबद्दल आपल मत कुणाजवळ तरी बोलायला सांपडावं म्हणून वाट पहात होतों तों अनायासं संधी आली. लव्ह मॅरेजबद्दल माझं मन बदलून आपल्या जुन्या पद्धतीकडेच माझं मन हल्लीं झुकूं लागलं आहे! कारण होतं काय, घड्याळाच्या स्प्रिंगसारखं जुन्या पद्धतीप्रमाणं 'टिक्टिक्' करून २४ तासांत स्प्रिंग उलगडणं निराळं आणि या लव्ह प्रोसेसनं फटकन् एका मिनिटांत उलगडणं निराळं! लव्ह-मध्यें सुरुवातीलाच कडेलोट होतो, त्यामुळं त्याचा शेवट गोड होतोच असं नव्हे—म्हणजे याचा अर्थ आमचं कांहीं बिनसलं आहे असा घेऊं नकोस हं! पूर्वपरिचयाच्या अभावीं एकदम फार्स

म्हटला राजापुरी गंगेप्रमाणं उपटणारं हें प्रेम राजापुरी गंगे-प्रमाणंच केव्हां अदृश्य होऊन त्या जागीं कच्छचं रण निर्माण होईल याचा कांहीं नेम नसतो.

**शाळिग्रामः**—असं ! हें केव्हां कळायला लागलं आपल्याला ?

**वसंतः**—अजून पुरतं कळलं नाहीं, पण अशा विचारांच्या अंधुक छटा येऊं लागल्या आहेत माझ्या डोक्यांत हल्लीं !

**शाळिग्रामः**—असो, कांहीं वाईट नाहीं !

( एक वृद्ध गृहस्थ दादा या नांवाचे आपल्या सोळा वर्षांच्या यमुना या नांवाच्या मुलीला घेऊन येतात. )

**दादाः**—वसंतराव काळे आपलंच नांव का ?

**वसंतः**—हो, कां कुणाकडनं आलांत आपण—काय आपलं नांव ?

**दादाः**—मी आपल्या श्वशुरांकडून आलों. माझं नांव अनंत आत्माराम पर्वते.

**वसंतः**—कां, कांहीं निरोप वगैरे ? का चिठ्ठी वगैरे आणिली आहे ? बसा, आणि बरोबर कोण आपली मुलगी वाटतं ?

**दादाः**—होय, मुलगीच माझी. नांव यमुना हिचं. हिच्या-करितां स्थळ पहात हिंडतों आहें आज दोन वर्षं. परवां सहज कळलं, आपले मेहुणे लग्नाचे आहेत म्हणून—म्हणून आपल्या सासऱ्यांकडे गेलों, तेव्हां त्यांनीं सांगितलं—त्यांची इच्छा आहे मुलाचं या वर्षी लग्न करण्याची पण मुलाची इच्छा दिसत नाहीं; तेव्हां त्यांनीं मला तुमचा पत्ता दिला—मुलगा आपणाकडेच आहे ना सध्यां ? तेव्हां म्हटलं त्यांनाच मुलगी दाखवावी—असली त्यांना पसंत तर मग बोलूं पुढं—बोला आतां, काय करणार ?

गरजवंताला नाहीं अक्कल—म्हणून मुलीला कांखोटीला मारली आणि आलों इकडे—पहा बुवा कांहीं जमवलंत तर—

**वसंतः**—हें पहा मी काय जमवणार ! हा प्रश्न ज्याचा त्यानं सोडवायचा आहे ! शिवाय त्याचं शिक्षणही अजून पुरं व्हायचंय—

**दादाः**—अहो शिक्षणाचं काय, बायको का शिक्षणाच्या आड येणार आहे ?

**वसंतः**—हें खरं, पण शिक्षण पुरं झालं म्हणजे—

**दादाः**—बाकी शिक्षण—शिक्षण हल्लींच फार वाढलं बुवा ! अहो आमच्या वेळेला इंग्रजी शिक्षण म्हणजे किती—हॉवर्डचीं तीन बुकं—ती तीन बुकं शिकलेले लोक मामलेदार झाले आहेत हल्लीं !

**वसंतः**—पण जुना काळ गेला तो, असं नव्हे का ? आणि—हो माझं लक्षच गेलं नव्हतं—( यमुनेकडे पहात ) यांना सांगा बसायला, नाहीं तर आंत जायला—आंत आहेत बायकामाणसं.

**दादाः**—हं यमू, उभी काय राहिली आहेस ? नमस्कार कर यांना.

( वसंत नको नको म्हणत असतां यमुना दोघांना नमस्कार करते. )

**वसंतः**—( शालिग्रामास ) काय शालिग्राम, आहे का नाहीं कोपरापासून नमस्कार करायची वेळ. काय लेकाचा आचरट आहे ! बाकी हा कसला आचरट म्हणा—आमच्या समाजानं सगळ्याच मुलींच्या बापांना आचरट बनवलं आहे ! आणि प्रत्येकाला मुलगे व मुली असल्यामुळं हें टक्याचं भांडण कधींच संपायचं नाहीं ! कुठं स्थळाचा वास लागला कीं गांव नाहीं परगांव नाहीं, ‘राणीका

बंगला देखो ' करीत हिंडणाऱ्या भिकाऱ्यांप्रमाणं मुलगी मारली कांखोटीला कीं चालले ! कांहीं स्वाभिमान—कांहीं नाहीं ! आतां आपण याची थोडी गंमत करूं, हं. तूं मात्र बोलूं नकोस हं कांहीं.

**दादाः**—बरं पाहूं या एकदां खडा टाकून ! आहेत का आपले मेहुणे घरांत ?

**वसंतः**—( शाळिग्रामकडे बोट दाखवीत ) हो, आहेत कीं. हेच आमचे मेहुणे. यांचंच लग्न व्हायचंय अजून.

**दादाः**—( शाळिग्रामला नमस्कार करीत ) असं का, यमुने जा पाहूं तूं घरांत–खालीं बायकामाणसांत––(यमुना या बाजूची त्या बाजूला होते.)

**वसंतः**—थांबा हं. मी वरच हांक मारतों कुणाला तरी. म्हणजे त्यांना आंत जायला बरं !

( वसंत जातो.)

**दादाः**—काय, मग कसं काय, आहे का या वर्षी आपला लग्न करायचा विचार ?

**शाळिग्रामः**—कुणाचा माझा ?

**दादाः**—हो, वयाच्या मानानं लग्न करायलाच हवं आतां.

**शाळिग्रामः**—अहो, माझ्या लग्नाचं मी काय बोलणार ! वडील समर्थ आहेत.

**दादाः**—हंऽहं ! काय हें बोलणं. वडिलांनीं आम्हाला आपल्या-कडे बोट दाखवलं आणि आपण वडिलांकडे बोट दाखवितां—

**शाळिग्रामः**—साफ खोटी गोष्ट आहे––मी वडिलांना लग्ना-बद्दल नकार कधींच दिला नाहीं !

**दादाः**—पण ते म्हणतात आपण—

**शाळिग्रामः**—आतां ते असं म्हणतात त्याला मी काय करूं? हा मी आतां एका पायावर लग्न करायला तयार आहें! ( उठून उभा रहातो.)

**दादाः**—तसं नव्हे--रागाऊं नका--आम्ही नडलेलों—

**शाळिग्रामः**—खरंच, मला कींव येते आपली! ( स्वगत ) हं, आतां असंच.(उघड)हं, आतां असं करा तुम्ही, वडिलांचं माझ्या संमतीवरच अडून राहिलं असेल तर माझी तयारी आहे! ( यमुनेकडे पहात ) मुलगी आपल्याला पसंत आहे. पण हें लग्न जमावं अशी आपली इच्छा असेल तर आमच्या या मेहुण्यांच्यादेखत, नव्हे इथं कुणाच्याचदेखत--मला तुम्ही कांहींएक विचारूं नका. कुणी 'आपण इथं कां आलांत' असं जरी विचारलं तुम्हांला तरी 'सहज हवा पालटायला आलों—वसंतरावांच्या वडिलांचा आणि आमचा खूप स्नेह होता-म्हणून आलों' असं सांगा—आणि मग तुम्ही मला एकान्तांत भेटा. मग मी चिठ्ठी देईन वडिलांना माझ्या पसंतीबद्दल—पण त्यांच्यादेखत गोष्ट काढूं नका; त्याचं कारण असं—इथं त्यांच्या नात्यांतली एक मुलगी आहे लग्नाची—ती माझ्या गळ्यांत बांधण्याचा आहे त्यांचा विचार-आणि ती कांहीं नाहीं मला पसंत—तेव्हां या अडचणींतून बाहेर पडायला मी मार्गच पहात होतों. अनायासं आपण भेटलांत मला—

**दादाः**—हरकत नाहीं. मग मी एकीकडे भेटेन आपल्याला! बरं, मुलीची पत्रिका वगैरे?

**शाळिग्रामः**--अहो आमच्या वडिलांना दाखवा, मला काय कळणार त्यांत--मुलगी पाहिली ती मला पसंत आहे! (स्वगत) म्हणे पत्रिका! या जुन्या खोडांच्या अजून कसं लक्षांत येत नाहीं कीं हल्लीं मुलांचं लक्ष पत्रिकेपेक्षां--पण जाऊं द्या झालं!

दादाः—हरकत नाहीं—मग एकीकडे भेटेन आपल्याला ! सुटलों बुवा या लग्नाच्या कचाट्यांतून ! बाकी आतांच कसला सुटलों म्हणा—जेव्हां माझ्या मुलीच्या आणि आपल्या डोक्यावर अक्षदा पडलेल्या पाहीन तेव्हां खरा सुटलों ! हुंड्याचं वगैरे एवढं कांहीं विशेष नाहीं—अहो एवढीच मुलगी मला—

शाळिग्रामः—पण वसंतराव अजून कसे आले नाहींत बुवा ? थांबा हं मी आंत जाऊन येतों. (स्वगत) आतां आंत कुठं जायचं ? आणि कसं जायचं ? जावं झालं आंत—सध्यां हे चार दिवस म्हणजे विचार करायचा नाहीं—दिसेल तशी वाट काढायची ! एकूण आमच्या या रोमान्सची गुंतागुती लागली वाढायला—नाहीं तर बसावी कुठून तरी अचानक श्रीमुखांत ! ( जातो.)

दादाः—यमू—

यमुनाः—( जवळ येऊन ) काय दादा ?

दादाः—पाहिलेस का तुझे भावी यजमान ?

यमुनाः—हो, तुम्हीच थट्टा करतां वाटतं ?

दादाः—बाकी तुझा नवराहि दिसतोय थट्टेखोरच म्हणा—

यमुनाः—इतक्यांत नका बाई बोलूं कांहीं—

दादाः—बरं—आतां नीट वाग हो—

यमुनाः—बरं ! ( वसंत व वासंती येतात. )

वसंतः—ई, तुम्ही जा यांच्याबरोबर घरांत ! ( यमुना व वासंती जातात. ) बरं, उतरलांत वगैरे कुठं ?

दादाः—आहेत एक आमच्या गांवचे इथं—त्यांच्याकडेच उतरेन म्हणतों—

वसंतः—मग असं करा, उतरा कीं इथंच आणि जा मग एकदोन दिवसांत—

**दादा**:—नाहीं पण तुम्हांला कां उगीच त्रास ?

**वसंत**:—अहो त्रास कसला त्यांत? शिवाय आमच्या सासुरवाडीच्या ओळखीचे तुम्ही—त्यांचे व्याही होऊं घातलेले—रहा कीं इथंच—ठेवा कपडे वगैरे काढून. ( त्यांची ट्रंक व वळकटी आपणच आंत नेऊन ठेवतो. )

**दादा**:—फारच आग्रही स्वभाव बुवा आपला—

**वसंत**:—चालायचंच. ( दिलरुबा येतो.)

**दिलरुबा**:—चला वसंतराव, ताईनं खालीं फराळाचीं पानं मांडलीं आहेत—सगळ्यांचीं.

**वसंत**:—बरं. चला कीं— ( जातात. )

**दिलरुबा**:—हें काय, हा म्हातारा कोण आणखी ? आणि अगोदरच आंत आली ती षोडशवर्षीय कन्यका कोण ? विचार केला पाहिजे ही मुलगी लग्नाची असली तर ! बाकी ही नवीन मुलगी म्हणजेसुद्धां मुग्धकाव्य आहे ! आणि नर्मदा हें सुद्धां काव्यच, पण वुइथ फुल नोटस् ! आतां काय करावं—या काव्यकान्तारांत शिरावं का—

[ राग—बिहाग, ताल—त्रिताल ]

**काय भ्रमवि मन मानस रमणी। अभिनव यौवनलीला दाउनि ॥ ध्रु० ॥**

**मुग्ध सुमन कलिका जणुं यमुना। हरित चित्त स्मर-चेष्टा करुनी ॥ १ ॥**

**नवयौवनयुत परी नर्मदा। नयनबाण सोडी अनुरागिणि ॥ २ ॥**

---

## प्रवेश तिसरा

( स्थळ--बागेजवळील रस्ता. )

**नर्मदाः**—बाई बाई बाई ! कळस झाला बाई अगदीं ! कुठनं त्यांच्या नादानं वागलें आणि हा भलता हंशा करून घेतला ! वासंती म्हणते, "भाऊचं अजून शिक्षण पुरं झालं नाहीं म्हणून, नाहीं तर मी आपलं घरोब्यानं म्हटलं असतं नर्मदेला कीं माझी वहिनी हो म्हणून !" नशीब त्या भावाचं आणि माझं ! काय बाई हंशा करून घेतला मी आपला ! अशी कशी बाई बावचळलें मी ? काय मेला पाचकळपणा झाला हा ! खरं म्हटलं तर त्यांची मी लग्नाची बायको, पण मेल्या या थट्टेनं त्यांच्याशीं बोलेन म्हटलं तर चोरी झालीय मला ! वासंती आणि वसंत कसे प्रेमानं खेळतात, बागडतात आणि मला—त्यांच्याशीं बोलायची चोरी ! शर्थ झाली ग बाई ! आम्ही लग्नाचीं नवरा-बायको, पण आज मला त्यांच्याशीं बोलायचं आहे तर कोण प्रयास ! शेवटीं त्यांच्या पुस्तकांत चिठ्ठी घालून ठेविली इथं या म्हणून--आतां येऊं देत तर खरे इथं, अशी खरडपट्टी काढतें त्यांची ! मेली लाज कशी नाहीं वाटली जिवाला--मला सांगायला सांगितलं कीं माझं लग्न झालं नाहीं म्हणून—आणि मी तरी कां ऐकावं पण त्यांचं त्या वेळीं ! अगदीं तोंडांत मारून घेतल्यामारखं झालंय बाई मला ! पहा, पहा आतां—अजून आले नाहींत ! का विसरले यांचं माझ्याशीं लग्न झाल्याचं ? ( दिलरुबा प्रवेश करतो.)

**दिलरुबाः**—( चिठ्ठी वाचीत ) यंव ! यंव, यंव !! आहेच मी तसा रुबाबदार ! पाहिलं चिठ्ठींत काय म्हणतीय ती ? "आपण आज संध्याकाळीं–सहा साडेसहा वाजतां बागेंत--" म्हणजे इथं

" मला भेटावं. तुम्हाला मला एक गंमत सांगायची आहे. सर्वस्वीं आपलीच--नर्मदा " गंमत आहे! माझ्याअगोदर इची सुरुवात! त्या-प्रमाणं आपण वेळ तर बरोबर गांठली. अरेच्या, पण पत्रावर नांव नाहीं कुणाचं ! विसरली वाटतं नांव घालायला ! आं, का लाजली ? लाजली असली तर चारी मुंड्या चीत झालों बुवा आपण ! नाहीं, पण खरंच, ती लाजली असेल का विसरली असेल ? नाहीं, पण विसरली असेल का लाजली असेल ? ( डोळे मिचकावून ) आतां करावी गंमत. ( फाउंटनपेन काढून पत्रावर 'प्रिय दिलरुबा यांस सविनय विनंति ' असे लिहितो.) अरे वा, तिचं आणि माझं अक्षरसुद्धां बारीक पाहिल्याशिवाय निरनिराळं आहे हें ओळखूं येत नाहीं ! चालायचंच ! एकूण काय गंमत आहे ! (पाहून) यंव ! काय खुळा आहें मी--ती केव्हांच इथं येऊन बसली आहे मला तिची गंमत सांगण्याची वाट पहात ! ( नर्मदेजवळ जाऊन ) प्रिये !—

**नर्मदा:**—( दचकून ) कोण, कोण तुम्ही ?

**दिलरुबा:**—वा ! ओळख विसरलीस वाटतं इतक्यांत ? मला कोण म्हणून विचारतेस ! काव्यांत सांगूं--**दिलरुबा हा या जिवाचा—**

**नर्मदा:**—( स्वगत ) खरं आहे ! तमाशा चाललाय मात्र माझ्या आयुष्याचा या वेळीं ! (उघड) ऐकलंत का, पाचकळपणा पुरे करा--कुणाशीं बोलत आहांत आपण ?

**दिलरुबा:**—माझ्या प्रियतमेशीं !

**नर्मदा:**—हं, सांगून ठेवतें, फाजीलपणा कराल तर माझ्याशीं गांठ आहे !

दिलरुबा:—आणि तीच गांठ सदैव पडावी म्हणून तर तुझ्यामागं इतक्या लांब तंगड्या तोडीत आलों—

नर्मदा:—पण तशी माझी इच्छा नसली तर—

दिलरुबा:—मग काय, आम्हाला नुसतीच गंमत सांगणार ?

नर्मदा:—कसली गंमत ?

दिलरुबा:—आहा, आऽहा, तुझं तुलाच शोभून दिसत बुवा ! 'फसलीस वेडे ! कां घेतीस आढेवेढे !' हें बघ, मं शरण आहें तुला—तुझ्या सर्व अटी मला कबूल आहेत ! बरं, ते जाऊं दे—तूं कबूल केलेली गंमत केव्हां सांगणार मला !

नर्मदा:—कुणी, मी कबूल केलं तुम्हाला ? कांहीं वेडबिड तर नाहीं लागलं—का भांगबिंग घेतलीत—का दारुबिरू प्यालांत—का माणसांतनं उठलांत—काय, झालं तरी काय तुम्हाला ?

दिलरुबा:—कांहीं झालं नाहीं, गंमत झाली नुसती गंमतीची ! अग, मी काय ओळखून नाहीं हा पुराव्याचा कायदेशीर काळ आहे हें ! नुसत्या तुझ्या बोलावण्यावरनं किंवा नजरेच्या खुणेनं मी इथं आलों असतों तर तूं मला एका मिनिटांत पागल ठरवलं असतंस ! पण प्रिये—हें पाहिलंस का पत्र ! ( चिठ्ठी तिला दाखवितो.) कां, पटली का साक्ष तुझ्या-माझ्या प्रेमाची ! अग तुझ्या सहीशिक्क्यानिशीं 'प्रेमाचा कागद' झालाय आपला हा—

नर्मदा:—( घाबरून ) पाहूं—पाहूं कसली चिठ्ठी ! (स्वगत) घात झाला गऽबाई घात झाला ! ह्या मेल्याच्या हातांत कुठनं पडली ही चिठ्ठी ? (उघड) काय हो, कुणी दिली ही आपल्याला चिठ्ठी ? उगीच भलताच समज करून घेऊं नका हं. माझं लग्न आधींच ( जीभ चावून ) माझ्या वडिलांनीं ठरवलं आहे—आणा ती चिठ्ठी इकडे—

**दिलरुबाः**—नाहीं नाहीं; तुम्हीच सांगा, तुमचं लग्न जर तुमच्या वडिलांनीं अगोदरच ठरवून ठेवलं आहे, तर मग ही गंमत मागण्याची चिठ्ठी आपण कुणाला लिहिलीत? वसंतरावांना का त्या पाहुण्या शाळिग्रामाला—दगड लेकाचा !

**नर्मदाः**—तुम्हाला काय हो त्यांना नांवें ठेवायचा अधिकार?

**दिलरुबाः**—कां, आपणशी कड घेतलीत त्यांची? अरेच्चा, त्यांनाच ही चिठ्ठी आहे तर! भाग्यवान आहे बुवा! पण नर्मदे, माझंही तुझ्यावर प्रेम बसलं आहे, त्याला काय इलाज?

[ कानडी ]

**बघ सुंदरि शरण तुला। दास असे हा आला॥**
**सोडुनिया कोप आतां वरि अनुरागाला॥ धृ०॥**
**भ्रमरासम लुब्ध किती। मम मानस तुजवरती॥**
**होउनिया बघ भरती। येई प्रेमासि किती॥**
**देऊनिया अधरपान। तुष्ट करी त्याला॥१॥**

**नर्मदाः**—पुरे करा हा पाचकळपणा, कांहीं लाज आहे का नाहीं!

**दिलरुबाः**—हां हां! सबूर! आपली लाज काय किंमतीची आहे तें दिसतंच आहे कीं या चिठ्ठीवरून! अरे वा, काल तो शाळिग्राम एका गांवाहून आला—तूं दुसऱ्या गांवाहून आलीस—दोघांची बोली नाहीं, भाषा नाहीं—कांहीं नाहीं आणि त्याला चिठ्ठी? आता करूं का गंमत? त्या तूं त्याला म्हणून लिहिलेल्या चिठ्ठीवर मी आपल्या हातानं आपलं नांव घातलं आहे! ही चिठ्ठी देतों आतां त्याला नेऊन, आणि त्याला सांगतों कीं, बाबा रे! वरवरच्या भपक्याला भुलूं नकोस, खरं असं आहे हें! बराय, जातों. ( घुटमळत उभा रहातो.)

**नर्मदाः**—( स्वगत ) काय बाई बोलूं मी आतां, आणि करूं तरी काय आतां या वेळेला ? आतांपर्यंत झाली मेली थट्टा ! पण ही थट्टा माझा प्राण घेणार कीं काय ? पुरुषांचा स्वभाव तो. नंवर एकचा संशयी; आणि या मांगानं त्यांत असं वीष कालवलं तर क्षणाभराच्या थट्टेनं माझ्या आयुष्याची नासाडी व्हायची ! आतां काय करणार ? तोडच नाहीं दुसरी ! आतां नाट्याचाच आधार घेतला पाहिजे ! ( उघड ) हे पहा, फसलात आपण ! आपल्या-करितांच होती हो ती चिठ्ठी ! म्हटलं पाहावं आपली कितपत तयारी आहे ती ! नाही तर म्हण आहे ना—

**दिलरुबाः**—म्हणी वगैरे नंतर—पण खरंच ती चिठ्ठी माझ्याकरतां होती ना ?

**नर्मदाः**—हो, हो, हो. कितीदां सांगूं ? पुन्हां म्हणूं—हो—हो—हो—

**दिलरुबाः**—बस्, बस्, बस् ! प्रिये, मला दुसरं कांही नको—

**तुझा मी अन् तूं ही हो माझी !**

**नर्मदाः**—( घाबरून ) हं, हे पहा, ते नवीन पाहुणे दादा का कोण ते—त्यांनीं पाहिलं वाटतं आपल्याला ! चला, त्यांना हाक मारून त्यांच्याबरोबरच जाऊ आपण—नाहीं तर म्हाताऱ्याला भलताच संशय येऊन व्हायचं कांहीं तरी भलतंच !

**दिलरुबाः**—मग त्यांत काय आहे ? केव्हां तरी उघडकीला यायचंच हें !

**नर्मदाः**—येईल तेव्हां येईल; पण आतां नको ! ऐकायचं ना माझं—हांक मारा तर मग त्यांना—हं जा आतां—मी जरा बाजूला तरी उभी रहातें बाई !

( नर्मदा जाते. दादा प्रवेश करतात. )

**दिलरुबाः**—आज्ञा प्रमाण ! दादा, दादा वा ! वाट चुकलांत वाटतं ? का इकडेच आलां होतात. चला की, परत फिरायचं ना आतां ?

**दादाः**—ओ हो हो ! कोण आपण. हो चला की घरीच, परंतु–

**दिलरुबाः**—( स्वगत ) बोलायचं कसं अगदी जिवावर येतंय, पण नर्मदेच्या म्हणण्याप्रमाणं या म्हाताऱ्याला आमच्या 'लव्ह'चा कांहीं संशय नाही येऊं देतां कामा, म्हणून—वद वद वद जिव्हे— (उघड) हं थांबा कीं दादा, नर्मदाताईही आल्या आहेत ना फिरायला इकडे, जाऊं बरोबर आपण तिघंच !

**दादाः**—( स्वगत ) हा बेरडा ! ताई झाली का इतक्यांत, मेहेरबानी आहे आई म्हणून नाहीं म्हणालास ! (उघड) हं चला, हांक मारा कीं त्यांना—

**दिलरुबाः**—नर्मदाताई, अहो नर्मदाताई—थांबा हं दादा, आलोंच मी— ( जातो. )

**दादाः**—हींच ती दोघं ! वा छान ! गांवाबाहेर हे असे रंग-ढंग करायला सांपडतात, मग कशाला जातील दिवाळीच्या सुटीत ही कार्टी घरीं ! हें असं आहे का ? आणि आमचे होऊं घातलेले जांवई म्हणतात कीं ह्या सटवीचं लग्न त्यांच्याशी ठरवणार आहेत वसंतराव ! ही करतीय हे असले रंगढंग इकडे—

( नर्मदा व दिलरुबा प्रवेश करतात.)

**दिलरुबाः**—हं दादा चला—

**दादाः**—हं, चला कीं. ( दादा व दिलरुबा जातात. )

**नर्मदाः**—थांब मेल्या, ती चिठ्ठी तुझ्या हातांत सांपडली म्हणून मला धाक दाखवतोस होय ? पुरुषांचा या बाबतींत संशयी स्वभाव म्हणून पड खाल्ली या वेळी ! थांब हं, तुलाच लिहिली होती ती चिठ्ठी ! अशी तुला गंमत सांगतें आतां—कीं

बन्निशीच पडली पाहिजे तुम्ही ! नाहीं तर कुणाकडून तरी--कुणाकडून म्हणजे कुणाकडून—इकडूनच श्रीमुख रंगवतें बघ तुझं !

---

## प्रवेश ४ था

(स्थळ—वसंताचा दिवाणखाना. पात्रें--वसंत व वासंती)

**वसंतः**---वासंती, काय ग, भाऊ कुठ गेला तुझा ?

**वासंतीः**---कुठं गेलाय कुणास ठाऊक ! दोनअडीच तासांनीं येतों म्हणून सांगून गेला आहे !

**वसंतः**---आणि ते म्हातारबुवा आणि त्यांची मुलगी ?

**वासंतीः**---ते म्हणत होते 'आलोंच आहोत सहज पुण्यांत, तर बघूं या इथलीं पहाण्यासारखीं स्थळं' म्हणून पर्वतीला का कुठं गेले आहेत वाटतं !

**वसंतः**--मग खालीं कोण आतां ? नर्मदा आणि शालिग्रामच वाटतं ?

**वासंतीः**—हो ! काय, आपण पाठविलंत का पत्र ? त्या दिवशीं मी सहज थट्टेनं बोललें, पण भविष्यासारखं खरं होणार बाई माझं बोलणं !

**वसंतः**—अग होणार म्हणजे काय, झालंच पाहिजे ! आणि आहेतच मुळीं तीं दोघं एकमेकांकरितां !

[ राग—हमीर, ताल—त्रिताल ]

**कैसी विधीलीला ही । शोभत मधुवर पाहीं ॥धृ०॥**
**सहज विनोदें बोलुनि गेलिस । आली त्यास**
**उचितताही ॥ १ ॥**

तुझ्या लक्षांत आल्या आहेत का त्यांच्या कांहीं गोष्टी?

**वासंतीः**—कुणाच्या, माझ्या का लक्षांत येणार नाहींत असल्या गोष्टी? एकमेक समोरासमोर आलीं कीं एकदम चपापतात काय, मुखस्तंभासारखी काय बसतात, मुस्कारे काय टाकतात एकमेकांकडे पाहून, जणुं जन्माचे विरहीच अचानक समोरासमोर आणून बसविले आहेत! अजून नजरेचं तारायंत्र चालून शब्दाच्या तारा मात्र जाऊं लागलेल्या दिसत नाहींत! आतां आपण त्यांची गंमत करूं या. घरांत नाहींच आहे कुणी, आपणही जाऊं दोघं बाहेर आणि पाहूं या चोर चोरी करतात का?

**वसंतः**—अस्सं! आपला काय अदमास आहे—चोर चोरी करतील कीं नाही?

**वासंतीः**—याच उत्तर आपणच माझ्यापेक्षां जास्त बरोबर देऊं शकाल!

**वसंतः**—काय मी? म्हणजे मला काय चोराचा माथीदार समजते आहेस का चोर समजते आहेस तूं?

**वासंतीः**—समजायचं काय, आहांतच मुळीं आपण!

**वसंतः**—काय—आहांत काय? काय चोर आहें काय मी?

**वासंतीः**—संशय आहे का यांत कांहीं! आपण कुठं चोरी केलीत, कशी केलीत, केव्हां केलीत—मला सगळं माहीत आहे! सांगतें हं आपण कुठं चोरी केलीत ती!

[ राग—भीमपलास, ताल—त्रिताल ]

**तस्करासम नसे कृति काय।**
**हरिलें नकळत हृदयधनाला॥ धृ०॥**
**वंचुनि मजला तैसे जनका।**
**करुनि कृति अशी वरि पुसतां का?॥ १॥**

आमचे बाबा उदार पडले म्हणून चोरलेली वस्तूच त्यांनी आपल्याला दान दिली लग्नाचा सोहाळा करून ! कळलं का आपण कशी चोरी केलीत ती !

**वसंतः**—अन् मग तुला माझी साथीदारी करायला लाज नाही वाटली ?

**वासंतीः**—हो, वाटते ना ! म्हणून तर चार लोकांत आपलं नांव घ्यायची वेळ आली की लाजावं लागतं मला ! पण आपल्याला आहे का त्याचं कांहीं ?

**वसंतः**—नाहीं हें कबूल आहे ! पण काय ग, नर्मदेच्या वडिलांना काय लिहिलंस तूं पत्र ?

**वासंतीः**—कीं, नर्मदाताईचं या वर्षी लग्न करायचा आपला विचार असला तर आमच्याइकडे एक स्थळ आहे म्हणून कळविलं आहे त्यांना ! व आपण सांगितल्याप्रमाणं शाळिग्रामपंतांची सगळी माहिती त्यांना कळविली आहे. पत्राचं उत्तर उलटटपालीच मागविलं आहे, पाहूं या काय उत्तर येतं तें ! त्यांच्याकडून जर होकार आला, तर जातांना नर्मदा-शाळिग्रामपंतांना केळवण करून मगच पाठवूं आपण त्यांना ! पण आपण लिहिलंत का शाळिग्रामपंतांच्या वडिलांना पत्र ?

**वसंतः**—हो, मजकूर हुबेहुब तुझ्या प्रत्राप्रमाणं ! फक्त नांवांची अदलाबदल ! म्हणजे तूं नर्मदेच्या वडिलांना जांवयाचा शोध लावून देण्याचा प्रयत्न केला आहेस आणि मी शाळिग्रामपंतांच्या वडिलांना सून हुडकून देण्याचा प्रयत्न केला आहे ! पण काय ग, नर्मदेला सांगितलीस का ही पत्र पाठविल्याची हकीगत ? मी शाळिग्रामाला सांगितली—पत्राची गोष्ट ऐकून त्यांनीं असा गोरामोरा चेहेरा केला आहे म्हणतेस——

**वासंतीः**—खरंच का ? बाई बाई, साम्य तरी किती दोघांत ? पत्र पाठविल्याची हकीगत मी नर्मदेला सांगितली मात्र. तर जसं कांही बाई एखाद्याचं रहस्य बाहेर फुटावं अन् फजिती व्हावी अशी स्थिती झाली तिची !

**वसंतः**—दोघंहि भीत असतील वडिलांना ! कारण नर्मदेचा बाप म्हणजे जमदग्नि, आणि शाळिग्रामाचा बाप म्हणजे परशुरामाचा बाप दुसरा ! मग त्यांच्या पोरांनी आपल्या कृत्याची कागाळी वडिलांपर्यंत गेलेली ऐकून कां घाबरूं नये ? कारण मी पत्रांत स्वच्छ लिहिलें आहे की शाळिग्रामपंतांस मुलगी पसंत असून आपण त्यांच्याकरितां म्हणून जी मुलगी नियोजित केली आहेत ती शाळिग्रामपंतांना 'हडळी 'सारखी वाटते आहे. तेव्हां याचा अवश्य विचार व्हावा !

**वासंतीः**—मी पण नर्मदेच्या वडिलांना लिहिलं आहे की, नर्मदाताईना शाळिग्रामपंत पसंत आहेत, पण आपण तिच्याकरितां म्हणून जो वर नियोजित केला आहे त्याला नर्मदा थट्टेनं ' शामभट ' म्हणते यांतच काय तें समजा ! चला, आतां आपण दोघंही बाहेर जाऊं या ! मी नर्मदेला परस्पर सांगून जातें आपण शाळिग्रामपंतांना सांगून परस्पर बाहेर पडा—पाहूं या तर खरी काय गंमत होतीय ती !

**वसंतः**—गंमत काय व्हायचीय—आपण जें केलं तेंच तीं करणार, चला !

( दोघेंही जातात. लगेच नर्मदा प्रवेश करते.)

**नर्मदाः**—बाई बाई बाई ! आतां अगदीं मला असं झालंय कीं इथं कुणी नाहीं घरांत तों फाडफाड तोंडांत मारून घ्याव्यात आपल्या आपणच ! नाहीं, पण वासंतीला हा चोंबडेपणा

करायला कुणी सांगितलं होतं ? आतां बाबा आणि आई म्हणत तरी काय असतील तिकडे ? मला बाई आतां अगदीं रडूं येतंय या वेळीं ! बाबा असे बुचकळ्यांत पडतील कीं, गेल्या वर्षी मी नर्मदेचं लग्न करून दिलं आणि नर्मदेच्या मैत्रिणीनं पुन्हां तिचं दुसरं लग्न जमविण्याचा कुठला घातला हा घाट—आणि नर्मदेलाहि हें पसंत आहे ! बाबा म्हणतील—पोरीनं काळं फासलं ग बाई तोंडाला ! पण म्हणावं, इथं या आणि पहा, आम्ही लग्नाचीं नवराबायकोच कशी एकमेकांच्या तोंडाला काळी फासतोय तीं ! पहा, पहा पण, परवांपासनं मारखं माझं तोंड चुकवीत आहेत ! पहातें एक दिवस वाट, नाहीं तर मग ठरवलं आहे कीं, वसंत-वासंतीच्यादेखत हात धरून विचारतें कीं, हा फाजीलपणा आपण केलात तो निस्तरायचा कुणी ? ( शाळिग्राम प्रवेश करतो. )

**शाळिग्रामः**—ह्या वसंत्याला हा फाजिलपणा करायला कुणी सांगितलं होतं ? आतां काका काय म्हणत असतील तिकडे ? चांगला विलायतला जाणार होतो पुढील शिक्षणाकरितां, तर काकां-च्या कुणी मनांत भरवलं, कीं मुलाला विलायतेला पाठवूं नका. नाहीं तर येतांना एखादी विलायती सून घेऊन यायचा आपला मुलगा ! आतां काकांना वाटेल कीं ज्याला फाजिलपणाच करायचा आहे त्याला विलायतेलाच कशाला जायला पाहिजे? मी दुसरी एखादी देशी सूनच पैदा करण्याच्या मार्गात आहें असं काकांना खास वाटणार आतां ! आतां काय करावं, वाटतं इथं कोणी नाहीं, तर झालेल्या गोष्टींचं प्रायश्चित्त म्हणून आपल्या आपण श्रीमुखांत भडकावून घ्याव्यात आणि सरळ घरचा मार्ग सुधारावा ! पुरे झाला रोमान्स आतां हा ! ( पहातो तों नर्मदा दिसते. दोघें एकमेकांकडे पहातात, रागावतात आणि हंसतात. )

**शाळिग्रामः**—काय हो, आपले शामभट कुठं आहेत ?

**नर्मदाः**—उभे आहेत एका हडळीशीं बोलत !

**शाळिग्रामः**—मग काय, ठरतंय का हडळीचं आणि खविसाचं म्हणतां—शामभटाचं लग्न ?

**नर्मदाः**—पाहूं या ! गेली आहेत आतां दोघांच्याही वडिलांना पत्रं—पाहूं या काय उत्तरं येतात ती !

**शाळिग्रामः**—म्हणजे, तुझ्याही वडिलांना पत्र लिहिलं आहे काय वासंतीनं ?

**नर्मदाः**—मग ऐकतां काय, आतां घरीं कोणच्या तोंडानं जाऊं असं झालंय मला ! आपला प्रताप हा सगळा !

**शाळिग्रामः**—अरेच्या ! असं झालंय खरं ! तोंड काय आतां याला ?

**नर्मदाः**—( शाळिग्रामच्या खांद्यावर हात टाकून ) ऐकलं का, मी सांगतें असं करावं !

**शाळिग्रामः**—हं ! हो बाजूला ! अमर्याद कुठली ! लग्नाआधीं परपुरुषाशीं इतका निकटचा संबंध ? काय लव्ह-मॅरेज आहे काय आपलं ? कुणी पाहिलं तर म्हणेल काय ?

**नर्मदाः**—काय पाहिजे तें म्हणेल ! सगळ्या गोष्टी राहूं द्यात आतां बाजूला ! चलायचं गडे, आपण बसूं या कोचावर जरा ! माझं बाई किनई डोकं दुखायला लागलं तुमच्या या रोमान्सनं !

**शाळिग्रामः**—माझासुद्धां अगदीं कपाळशूळ उठलाय ! पण करतां काय—तेव्हां लाडके, प्रिये—प्रियतमे ! जरा बाजूला हो—मर्यादेनं वाग कांहीं तरी !

**नर्मदाः**—त्या ब्रह्मदेवानंच आपल्या बाबतींत मर्यादा सोडली आहे, तेव्हां आतां भिती आहे का त्याच्या देवाची तरी ?

**शाळिग्रामः**—ब्रह्मदेवाच्या देवाची जरी भीति नसली तरी आपण ज्या घरांत उतरलों आहोंत तिथ वावरणाऱ्या वसंत, वासंती, दिलरुबा, यमुना, दादा या देवदेवेश्वरांची—या दगड-धोंड्यांची भीति नको का बाळगायला? अग सौभाग्यवती, आपण अजून अविवाहित आहोंत !

**नर्मदाः**—मला साफ कबूल नाहीं ! बऱ्या बोलानं सांगतें. आपणच केलेला हा 'अविवाहितपणा'चा घोटाळा दूर करा पाहूं आतांच्याआतां !

**शाळिग्रामः**—अग थांब, थांब सुंदरी—लग्नाच्याअगोदर दुर्दैवानं आपल्याला रोमान्स करायला मिळाला नाहीं—आतां अनायासं प्रसंग आला आहे तर करूं दे मला थोडंसं प्रियाराधन !

**नर्मदाः**—अस्सं का? प्रियाराधन करायचं आहे का आपल्याला--( नर्मदा जवळ जाऊं लागते.)

**शाळिग्रामः**—लाडके, जरा लांबून बोल-लांबून बोल. इतक्यांत जवळ येऊं नकोस, नाहींतर इतक्यांत कुणी तरी येईल, आपल्याला पाहील आणि आपण आपल्या अभिनव आचरट कल्पनेनं सुरू केलेलं हें नाटक पहिल्या अंकांतच खलास होईल !

**नर्मदाः**—( शाळिग्रामजवळ येऊन बसते.) गेलं तुमचं तें नाटक चुलींत ! ही पहा मी बसलें आपल्याला खेटून—येऊं देत, वसंतराव येऊं देत--वासंती येऊं दे--नाहीं तर आणखी कोणी येऊं देत--माझं अडलं आहे खेटर आपल्यापासून दूर व्हायला !

**शाळिग्रामः**—( तोंड फिरवून बसतो ) बराय, बसा आमच्याजवळ ! आम्ही पुरुष काय वाटेल तें करूनसवरून पुन्हां नामानिराळेच ! पण बघ, तुझी वासंती जर इतक्यांत आली—

आणि तिनं तुला अशी पाहिलीन—बघ, भलताच संशय घेईल ती तुझ्या माझ्यासंबंधानं ! याद राख तूं स्त्री आहेस !

**नर्मदाः**—हो, हो हो, घेऊं द्या हो तुमच्यामाझ्याबद्दल भलता संशय ! म्हटलं माझ्याजवळ रामबाण उपाय आहे त्यावर !

**शाळिग्रामः**—तो काय ?

**नर्मदाः**—इश्य ! तोंड काय फिरवून बसलांत असे ? का माझ्यावरचे तुम्हीच लाजलांत ? हें पाहिलंत का, हें पाहिलंत का पोलक्याखालीं लपवून ठेवलं असलं तरी मंगळसूत्र आहे हो माझ्या गळ्यांत संशय-निवृत्ति करायला !

**शाळिग्रामः**—म्हणतात ना, बायका कितीही शिकल्या तरी अजागळ त्या अजागळ !

**नर्मदाः**—हो हो—पुरे पुरे ! आपण काय कमी आहांत ? मला अविवाहित आहें म्हणून सांगायला सांगितलंत—तर तो वासंतीचा भाऊ दिलरुबा–का ताशावाजंत्री—कोण तो मेला मला म्हणत होता कीं त्याचं माझ्यावर प्रेम आहे म्हणून ! तेव्हां त्याला द्या काय उत्तर द्यायचं तें ! मी साफ सांगतें वासंती आल्यावर कीं, हा सूर्य आणि हा जयद्रथ ! तसं हें माझं मंगळसूत्र आणि हे 'हे !' टाकतें निकाल करून !

**शाळिग्रामः**—आणि त्या मंगळसूत्रावर काय माझं नांव कोरलंय वाटतं तें सांगणार कीं हे 'हे' म्हणून ! ! मला विचारलं तर मी साफ सांगणार कीं ही माझी 'ही' नव्हे। कारण माझं लग्न अजून व्हायचंय—ते पाहुणे—दादा आले आहेत ना, त्यांची मुलगी त्यांनीं मला देऊं केली आहे. मला ती पसंत आहे—बरं का बाईसाहेब !

**नर्मदाः**—बरं हो बुवासाहेब ! येऊं द्यात ते दादा आणि

यमुना. त्यांना खरं वाटेल माझं बोलणं—ते आल्यावर त्यांना सांगतें—

**शाळिग्रामः**—आल्यावरोबर त्यांना काय मागणार की—हो, पण मी मगाचा एक मुद्दा विसरलो! त्या दिलरुब्याचं तुझ्यावर प्रेम बसलं आहे, नाहीं का? मूर्ख लेकाचा! पण त्याची तरी काय चूक आहे त्यांत? नर्मदे—

**नर्मदाः**—अजून नाही का हौस पुरली—कशाला म्हणता इतक्यांत नर्मदे म्हणून! म्हणा कीं प्रिये, प्रियतमे, यंव आणि त्यंव!

**शाळिग्रामः**—हो हो, म्हणणार! तूं काय समजली आहेस?

**नर्मदाः**—मी काय समजलं आहे सांगूं का—येऊं द्यात तर खरं आतां चार माणसं—

**शाळिग्रामः**—हं नर्मदे, मी आतां रागावलों आहें! जर का तूं आतां इतक्यांत आपलं रहस्य फोडलंस तर सांगून ठेवतों—मी डोक्यांत राख घालून—तुझ्या अन्नवस्त्राची सोय देईन लावून आणि करीन त्या यमुनेशीं लग्न!

**नर्मदाः**—तोंडच्या असतील या गोष्टी, नाहीं म्हटलं—तोंडच्या असतील या गोष्टी!

**शाळिग्रामः**—हं बघ, हें पुरे आतां. ये, इकडे ये अशी. (तिच्या खांद्यावर हात टाकून) हें बघ, एवींतेवीं करूं नये, आपण संभावित चावटपणा केला आहे खरा—चार दिवस निभावले आहेत, आणखी दोनचार दिवस पाहूं या तर खरी काय गंमत होतीय ती—

**नर्मदाः**—इश्श! झाली ही गंमत थोडी का झाली?

**शाळिग्रामः**—तुमच्या बायकांचं किनई झालं तर थोडक्यांत समाधान नाहीं तर भलता हव्यास!



नर्मदाः—क्रां माझ्यावरचें तुम्हीच लाजलांत ! (पृ. ४७)

**नर्मदाः**—पण काय हो, बाबा म्हणतील तरी काय आतां ? मला बाई किनई त्या पत्राची आठवण झाली कीं डोळे कसे भरून येतात !

**शाळिग्रामः**—पुरे पुरे, उगाऽऽउगा, रडूं नको, मी पुसतों तुझे अश्रु ! प्रियेचे अश्रु पुसण्यांत काय रोमान्स आहे तो एक कवीच्या जातीला माहीत कीं मला माहीत ! (नर्मदेचे डोळे आपल्या हात-रुमालानें पुसतो.) ह, हो बाजूला ! नाही तर जर का कुणीं आपल्याला असं पाहिलं तर आमची नायिका संकटांत सांपडायची ! (तिला दूर ढकलतो.) लाडके, रागावू नकोस—रांगावूं नकोस, तुला मी प्रेमासाठीं दूर ढकलती आहें बरं !

**नर्मदाः**—पुरे झाल्या बाई या तुमच्या प्रेमचेष्टा !

**शाळिग्रामः**—अग पण, याची बक्षिसी आपल्याला फार मोठी मिळायची आहे !

**नर्मदाः**—ती काय ? प्रेमाचा परिणाम जें लग्न, तें तर आपलं आधींच झालं आहे. आतां घरीं गेल्यावर बाबांच्याकडनं काय बक्षिसी मिळेल ती निराळी ! माझे बाबा म्हणजे जमदग्नि आहेत नुसते !

**शाळिग्रामः**—आणि आमचे काका म्हणजे परशुरामाचा बाप दुसरा ! घरीं गेल्यावर आईनं दिलेले तहानलाडू, भूकलाडू तर संपलेच आहेत आतां सगळे—काकांचे हात आतां नुसते वळवळत असतील—त्यांचे हे चिरंजीव घरीं गेले रे गेले कीं काका देणार ठेवून एक सणसणीत श्रीमुखांत !

(दोघेंजणें कोचावर बसतात. दिलरुबा प्रवेश करतो.)

**दिलरुबाः**—कोण नर्मदे—नव्हे नर्मदाताई—काय हो हें ?

( नर्मदा व शाळिग्राम उठून उभीं रहातात. एकमेकांकडे रागारागानें बघतात. शाळिग्राम नर्मदेला खूण करतो. नर्मदा स्तब्ध उभी रहाते.)

**दिलरुबा:**—काय नर्मदाताई, सांगूं का यांना आपली गंमत! प्रेमाचा विजय असो. काय हो शाळिग्रामपंत–अहो शिष्ट—

**शाळिग्राम:**—काय हो मिशानष्ट, फारसं तोंड मोकळं सोडलं आहे?

**दिलरुबा:**—( अंगांतील कोट वगैरे काढून फेंकून देत ) हं चल, हो युद्धाला तयार. तुला काय वाटलं? नर्मदेचं माझ्यावर पहिल्यापासून प्रेम आहे, असं असतांना––

**शाळिग्राम:**—याद राख! जपून बोल—एक पाऊल तर पुढं टाक—

**दिलरुबा:**—( एक पाऊल मागें घेत ) काय करणार रे तूं माझं? माझ्या प्रियेशीं (आणखी एक पाऊल मागें घेत) संगनमत करतोस? अरे चोरा––

**शाळिग्राम:**—ए मुजोर! लव्ह-मॅरेज करतो आहे लेकाचा, आव केवढा पहा! द्वंद्वयुद्धाला हांक मारतोय मला! लेका, एक थपडीचा नाहींस आणि आव काय आणतो अहेस? ये पाहूं पुढं–लव्ह-मॅरेज करायला मनगटांत जोर असावा लागतो समजलास—

**दिलरुबा:**—( स्वगत ) अरेच्या, प्रकरण एकदम हातघाईवर येणार––तसं नाहीं उपयोगाचं! आतां काय करावी बरं गंमत! इथं आणखी थोडासा फाजीलपणा जास्त करीन तर आहे श्रीमुखांत खायचा प्रसंग! तेव्हां ( उघड ) बरं बरं हा आलों पुढं––

**नर्मदा:**—अगबाई, हे अगदींच हातघाईवर आले—वासंती! अग वासंती–– ( जाते.)

**शालिग्रामः**—एक पाऊल तर पुढं टाक, की बसलीच समज श्रीमुखांत !

[ राग—बहार, ताल—त्रिताल ]

**अविचारि मूढ तूं का उगाच मजसी वैर धरिसी॥धृ०॥**
**कुक्कुटसम तूं वांछा करिसी कशास वरण्या राजहंसी**
**॥ १ ॥**

( शालिग्राम दिलरुब्याच्या अंगावर धाऊन जातो. दिलरुबा निसटून पळून जातो. शालिग्राम त्याचा पाठलाग करीत जातो.)

**अंक पहिला समाप्त**

# अंक दुसरा



## प्रवेश पहिला

( स्थळ--दिवाणखाना. पात्रे--नर्मदा व शाळिग्राम )

**शाळिग्रामः**—नर्मदे—

**नर्मदाः**—ओ, बोला बाई काय तें लवकर--नाहीं तर इकडे येईल आणखी कुणी तरी.

**शाळिग्रामः**—नर्मदे—

**नर्मदाः**—ओ म्हटलं ना ! इश्य, बोलायचं तर कांहीं नाहीं आणि नुसतं आपलं हांक मारीत सुटायचं ! समजायचं तरी काय बाई माणसानं अशानं ?

**शाळिग्रामः**—हो, तेंहि खरंच ! गाढवपणा झाला माझाच सगळा ! मीच आपणहून खाजवून खरूज काढली आणि आतां आग होतीय म्हणून ओरडत सुटलों आहें ! ह, मग काय म्हणते आहेस—

**नर्मदाः**—इश्य ! मी कुठं काय म्हटलं ? डोकं तर नाही फिरलं आपलं--

**शाळिग्रामः**—हो, तेंही खरंच ! मीच गाढवपणा केला ! ह मग काय ठरलं ?

**नर्मदाः**—हें काय बाई चालवलं आहेत आचरटासारखं ! काय, झालंय काय तुम्हाला आज ?

**शाळिग्रामः**—काय झालंय ? आतां काय सांगूं ? बरं नर्मदे,

माझं डोकं दुखतंय आज, जरा अमृतांजन मिळालं तर घेऊन ये पाहूं घरांतून—

**नर्मदाः**—काय, डोकं दुखायला काय झालं? अन् परकी मुलगी मी आतां—अजून लग्न व्हायचंय माझं—आणि मला हक्कान हें आण, तें आण, म्हणून सांगणारे तुम्ही हो कोण? आतां आपलं ऐकायच म्हणून ऐकतें आपलं! आलें हं आमृतांजनची बाटली घेऊन! ( जाते. )

**शाळिग्रामः**—( खिशांतून हातरुमाल म्हणून काढूं लागतो तों अमृतांजनची बाटली निघते.) अरे हो, डोकं दुखत होतं म्हणून मगाशींच अमृतांजन बाजारांतून विकत आणलं—आठवणच नाहीं! ( डोक्याला अमृतांजन लावीत ) लांकडाच्या चिरेंत शेंपूट सांपडलेल्या माकडासारखी माझी स्थिति झाली आहे! नर्मदेची दिलरुब्याला म्हणून लिहिलेली चिठ्ठी वाचून डोकं असं भडकून गेलं आहे—नर्मदेबद्दल संशय तरी कसा घ्यायचा?—मग डोकं कां दुखतं आहे! डोकं दुखायला लागल्यापासून 'संशय-कल्लोळ' नाटक पांच वेळ वाचलं पण डोकं कांहीं राहिलं नाहीं! बायकांच्या स्वातंत्र्याबद्दल लांब जीभ बाहेर काढून हातहात गप्पा मारतांना अंगांत भिनणारी उदात्त वृत्ति अशा वेळीं कुठं गेली? लोकांच्या बायकांबद्दल उदार मतं—अगदीं एकमेकांचं पटत नसलं तर काडी मोडून घ्यावी असं सांगण्याइतका सरळपणा—आणि आज माझ्या बायकोला—तिला विचारूं का सरळ—आणि सरळ तिनं माझ्या तोंडांत शेण घातलं तर—उघड विचारायची कांहीं सोय नाहीं आणि मनांतील संशय कांहीं जात नाहीं! कारण किती केलं तरी बायकांची जात—

[ राग--खमाज, ताल--त्रिताल ]

**पति अवगणिती अंगना। कधींही ना ठाउका, विनय तया**
**न बंधन मानिति अणुहि कदा त्या ॥ धृ० ॥**
**मज नको प्रणयचेष्टा। पुरे आतां। मजसम अन्य दुजा**
**नाहीं भुवनिं खरा। हत भग तो। कुटिल खऱ्या। या**
**अंगना ॥ १ ॥**

कायाशिवाय कारणं उत्पन्न होत असतील तर तीं फक्त स्वतःच्या वायकोबद्दल संशय घेण्यांत--नकोच मुळीं हा चक्रव्यूह! आतां नर्मदा आली कीं तिला सांगतों; आपलं सामानाचं गाठोड बांधून अगोदर या घराबाहेर पड--मीही तुझ्या मागोमाग निघतोंच--घरीं गेल्यावर हवापालट होईल आणि जाईल हा संशय निघून!

(अमृतांजनची बाटली खिशांत ठेवतो. नर्मदा प्रवेश करते.)

**नर्मदाः**--ही अमृतांजनची बाटली--चोळूं का आपल्या डोक्याला? पण नको बाई, माझं अजून लग्न व्हायचंय!

**शालिग्रामः**--नर्मदे, असं डंवचशील मला तर संन्यास घेईन इथल्याइथं!

**नर्मदाः**--मग मला काय सांगतां?

**शालिग्रामः**--अरे हो, सांगायचं राहिलंच तुला एक! अगोदर आंत सामानाची बांधाबांध कर आणि चल तडक स्टेशन-वर--गाडीला अजून पांच तास अवकाश आहे! हरकत नाहीं, स्टेशनवरच बसूं तोंपर्यंत! पण आतां इथें मात्र एक मिनिट नको!

**नर्मदाः**--तुम्हाला जायचं असलं तर जा तुम्ही! मी आणखी चार पांच दिवस तरी येणार नाहीं!

**शालिग्रामः**--पण मी सांगतों, राह्यचं नाहीं आतां इथं!

**नर्मदाः**—पण तुम्ही कोण सांगणार !

**शाळिग्रामः**—काय, माझं नाहीं ऐकणार तूं ?

**नर्मदाः**—नाहीं कुठं म्हणतें मी—पण इथं नाहीं, घरीं गेल्यावर ! संबंध काय तुमचा माझा इथं ?

**शाळिग्रामः**—अस्सं का ? नर्मदे, हें काव्य घरी गेल्यावर टिकायचं नाहीं ! शेफारून जाऊं नकोस अशी ! बायकांना जरा मोकळीक दिली—

**नर्मदाः**—तुमचीं व्याख्यानं ऐकायला मला वेळ नाहीं आतां—

**शाळिग्रामः**—अग आई अंबाबाई, मग मला तरी सांग आतां मी काय करूं तें ?

**नर्मदाः**—कां, अगदीं विव्हळायला काय झालं एवढं ? हो, असं करा तुम्ही आतां—पोस्टमन यायची वेळ झालीच आहे. बाबांच्याकडनं आणि आपल्या घरनं पत्राचीं उत्तरं आजही येतील कदाचित् ! तेव्हां दरवाजावर करा पहारा—आणि आलीं असलीं पत्रं तर करा हस्तगत आणि लावा त्यांची परस्पर वाट !

**शाळिग्रामः**—अरे हो, खरंच—तें एक खरकटं निस्तरायला हवंच ! पण काकांच्याकडून आलेलं पत्र तेवढं मी हस्तगत करीन; मला आतां तुझ्याशीं काय करायचं आहे ? तुझ्या वडिलांकडून आलेलं पत्र मुद्दाम मी सगळयांना दाखवीत सुटेन !

**नर्मदाः**—भय नका मला दाखवूं येवढं—मीही काढीन कांहीं तरी त्याला युक्ति. माझ्याही मनांत आतां कल्पनेनं काहूर घातला आहे—कारण घरीं गेल्यावर आपण माझ्या अन्नवस्त्राची सोय लावून देणार—तेव्हां माझी मला आतां एव्हांपासून व्यवस्था पहायला हवी !

**शाळिग्रामः**—नर्मदे, फाजीलपणा करूं नकोस. मी पत्रं आलीं असलीं तर दोन्हीही हस्तगत करतों. मग तर येशील ताबडतोब घरीं—

**नर्मदाः**—अग अग म्हशी आणि मला कुठं नेशी ! काय बाई म्हणी करून ठेविल्या आहेत आपल्या पूर्वजांनीं !

**शाळिग्रामः**—आतां फार फाजीलपणा करूं नकोस हं—खाडकन् तोंडांत मारीन !

**नर्मदाः**—नका—नका आविर्भाव करूं विनाकाण—हंसायला येईल फटकन्. वासंतीनं आपल्या स्थळाबद्दल माझ्या बाबांना कळवलं आहे, पण मी मुळीं त्यांना आतां स्पष्टच कळवतें कीं मला कांही आपलं स्थळ पसंत नाहीं म्हणून !

**शाळिग्रामः**—नर्मदे, काय चालवलं आहेस तूं हें—

**नर्मदाः**—तिखटमिठाचा रोमान्स—

**शाळिग्रामः**—पण तिखटमीठ फार होतंय—

**नर्मदाः**—त्याला मी काय करूं ? मी का सांगितला होता असला फाजीलपणा करायला—नाहीं पण खरंच का मी सांगितलं होतं ? हें काय गडे, आपलं लक्ष नाहीं माझ्या बोलण्याकडे ! माझं किनई बाई प्रेम बसलं आहे—कुणावर बरं ? राग का आला आपल्याला ? हो, राग आला असला तर रामबाण उपाय आहे माझ्याजवळ—म्हणून दाखवूं का आवडतीं रोमँटिक वाक्यं ? “नाथ, खडा मारायचा झाला तर तो घागरीवर नाहीं हं मारायचा ! आपण खडा मारलात आणि त्यामुळं माझी घागर फुटली—तर माझं अंग भिजणार नाहीं का—आणि मी अशी ओलीचिंब झालेली पहावेल का आपल्याला ? नाहीं पण पहावेल का ?”

( राग--मिश्रखमाज, ताल--दादरा )

**अनुचित कृति काय करूनि । सोडितसां विनया ॥धृ०॥**
**अजुनि असुनि अविवाहित । स्पर्शितसां काया ॥ १ ॥**

**शाळिग्रामः**--नर्मदे-( तिचा हात धरतो.)

**नर्मदाः**--हं, दूर व्हायचं गडे! कुमारिकेचा हात धरणं शोभतं का आपल्यासारख्या सभ्य पुरुषाला--( पडद्याकडे पाहून ) कोण मला हांक मारतं आहे तें--हो, आलें हो ऽ आलें! ऐकलं का, म्हटलं आलें हो आलें! (नर्मदा निघून जाते.)

**शाळिग्रामः**--काय अवर्णनीय प्रसंगांत सांपडलों आहें मी! माझं पात्र एखाद्या नाटककारानं रंगवलं तर 'हाफ मॅड फाल्गुनराव' म्हणूनच रंगवावं लागेल त्याला! छेः! कसला रोमान्स हा, उदासपणाची झांक मारते आहे माझ्या डोक्यांत! कसली किळसवाणी कल्पना मनांत येते आहे? नर्मदा, असला फाजीलपणा करूं शकेल का? सत्यसृष्टींतलं काय सांगूं, पण माझ्या मनःसृष्टींतील नर्मदेचं चित्र मात्र थोडंसं हिणकस ठरूं लागलं आहे! चला, पण अरे हो--ते पाहुणेदादा आणि त्यांची मुलगी यमुना आज जाणार आहेत नाहीं का गांवीं निघून--दादांना एकीकडे गांठून--त्या गोष्टीचा खुलासा करून--नाहीं आहे म्हणा कांहींच, पण आपलं सावध असावं हें बरं--आणि किती केलं तरी स्त्रिया त्या स्त्रियाच!

(जातो.)

---

## प्रवेश दुसरा

( स्थळ--रस्ता. एकीकडून बाबासाहेब--नर्मदेचे वडील व एकीकडून काकासाहेब--शाळिग्रामचे वडील प्रवेश करतात. )

**बाबा०ः**--ओ हो, नमस्कार! काय बाहेर निघालांत वाटतं कुठं?

**काका०**:—छेः हो, बाहेर कुठला जातों--आपल्याकडेच निघालों होतों !

**बाबा०**:—कुणाकडे, माझ्याकडे—अन् ते कां! मी हा अस्सा आपल्याकडेच निघालों होतों !

**काका०**:—कुणाकडे, माझ्याकडे--हा काय घोटाळा आहे ?

**बाबा०**:—मला एक पत्र आलं आहे आज. खालीं 'वासंती' म्हणून सही आहे त्या पत्रावर. पण तसं कशाला, हें पत्रच वाचून पहा आपण ! (पत्र देतो.)

**काका०**:—(पत्र वाचून पाहून, चष्मा कपाळावर ओढून बाबासाहेबांकडे रेखून पहात) अस्सं !

**बाबा०**:—असं का कसं तें पहा आतां. आमच्या नर्मदेच्या लग्नाचं जमवते आहे म्हणे ती बाई--वासंती का कोण ती !

**काका०**:—(आपल्या खिशांतून एक पत्र बाहेर काढीत) हा पाहिलात, त्या पत्राचा सख्खा भाऊ आला आहे माझ्या-कडे ! याच्याखाली सही आहे वसंत म्हणून. हा बेरड आमच्या शाळिग्रामाचं लग्न जमवूं पहात आहे ! हा कोणी चावटपणा केला आहे म्हणावं तर सध्यां शिमगाही चालू नाहीं ! बरं, आपल्याला 'एप्रिल फूल' ठरवायचा यांचा प्रयत्न चालू आहे म्हणावं, तर हा एप्रिल महिनाही चालू नाहीं !

**बाबा०**:—मग काय, सोनेरी टोळी तर नव्हे ही ! एका पत्रा-खालीं सही 'वसंत,' एका पत्राखालीं सही 'वासंती !' ही संभावित दुक्कल आहे तरी कोण बुवा ? अहो, नर्मदेला आम्ही दिवाळीची म्हणून माहेरपणाला बोलावून घेतली, अगदीं हट्टच घेतला पोरीनं म्हणून तिच्या मैत्रिणीकडे धाडली दिवाळीला ! मग काय, पोरटी

एखाद्या सोनेरी टोळीच्या तडाक्यांत तर नाही सांपडली ? काय करावं बुवा--दिवस तर हे असे !

**काका०ः**—अहो, पण आमचा हा कारटा तर फसायला किंवा फसवून न्यायला 'बाईबिई' नाहीं ना ? दोन्ही पत्रांवर पत्राच्या उत्तराकरितां एकच पत्ता दिलेला आहे--आणि तो गेला आहे मित्राकडे म्हणून, तेव्हां त्याला काय माहीत नसेल आमच्या शालिग्रामाचं लग्न झालेलं आहे हें ?

**बाबा०ः**—अहो, त्यांनीं कदाचित् आपल्या मित्राला नसेल कळवलं ! पण ह्या आमच्या कारटीच्या गळ्यांत तर धडधडीत मंगळसूत्र आहे ना ! त्याच्यावरनंही समजूं नये का तिच्या मैत्रिणीला ? का मंगळसूत्रही टाकलंन पोरीनं तोडून गळ्यांतलं ! हल्लींचीं पोरं ही काय करतील काय नाहीं याचा नियम नाहीं !

**काका०ः**—ह ! भलतंच काय बोलतां बाबा, असं कसं करील ती ! उगाच कांहीं तरी ! पण काहो, आतां माझ्या लक्षांत आलं—हं, हे पहा ह, ही वासंती आपल्या नर्मदेचं लग्न कुणाबरोबर ठरवूं पहातीय ! शालिग्रामाबरोबर ! आणि हे वसंतराव आमच्या शालिग्रामाच लग्न कुणाबरोबर ठरवताहेत ? नर्मदेबरोबर, अहो बाबा ! चावटपणा दिसतोय हो हा सगळा चावटपणा !

**बाबा०ः**—तें कांहीं नाहीं; चावटपणा असो नाहीं तर सोनेरी टोळी असो. हा अस्सा पहिल्या गाडीनं तडक जातों पुण्याला आणि पहातों काय पाजीपणा आहे तो !

**काका०ः**—कां मी जाऊं--म्हणजे मला दोन्ही कामं करतां येतील ! असलाच तसा कांहीं फाजीलपणा तर आपण आपल्या मुलीच्या भडकवाल एखादी 'श्रीमुखांत;' पण आमचा शालिग्राम-आपला जांवई ना तो-कितीही म्हटलं तरी आपण नमालच तिथं !

तेव्हां असं करतों—मीच जातों. म्हणजे—नर्मदेचा सुनबाईचाही घेतों समाचार आणि आमच्या चिरंजीवांच्या-शाळिग्रामच्याही भडकावतों एखादी 'श्रीमुखांत' दिसलच तसं कांहीं तर—

**बाबा०**:—का असं करतां—आमच्या हिचा भाऊ-नर्मदेचा मामा—यादव, अनायासं कालच आला आहे, त्यालाच देऊं तिकडे पाठवून ! तोच बरा आहे या कामाला—काढील दोघांची खरड चांगली—

**काका०**:—पण वेळ आहे का त्यांना—होईल का सवड ?

**बाबा०**:—वा, अगदीं आनंदानं ! अहो, तो अशा वेळीं नोकरीचीसुद्धां पर्वा करायचा नाहीं—शिवाय तो आहेही थोडासा गमत्या आणि चलाख ! वेळ पडेल तसा वागणारा ! अहो आमच्या 'हिचाच' भाऊ तो—आपल्याला आहेच त्याचा थोडासा परिचय !

**काका०**:—हो, आहे खरा लाख माणूस—मग केव्हां जायला सांगतां त्यांना ?

**बाबा०**:—केव्हां, अहो पहिल्या गाडीनं ! अरे वा ! हे पहा यादवमामाच इकडे आले ! शंभर वर्षे आयुष्य आहे बघ तुला यादव ! तुझ्याकडे आम्ही एक कामगिरी सोंपविणार आहोंत ! आज सकाळीं नर्मदेच्या मैत्रिणीचं पत्र आलेलं पाहिलंसच तूं ! त्याच मजकुराचं यांनाही शाळिग्रामच्या मित्राकडून पत्र आलं आहे ! तेव्हां तूंच जा समक्ष—आणि ये बाबा दोघांनाही परत घेऊन !

**यादव**:—बराय, आपली तयारी आहे ! ऐकलेल्या मजकुरावरून दोघांनींही कांहीं तरी रोमँटिक घोंटाळा केलेला दिसतो आहे ! आपण अगदीं आनंदानं जातों या कामगिरीवर ! खरंच, त्यांनीं



यादव०:—जांवईबुवांचीहि नाजुक थट्टा करायला सांपडेल ! (पृष्ठ ६१.)

कांहीं गंमत केली असली तर जांवईबुवांचीही नाजुक थट्टा करायला सांपडेल मला—

**काका०:**—निघाच तर मग पहिल्या गाडीनं! रजा वगैरे आहे ना आपल्याला?

**यादव:**—अहो रजा नसली तर सिक रिपोर्ट देऊन जाईन मी!

**काका०:**—बराय, चला तर मग दोघेही आमच्याकडे फराळाला.

**बाबा०:**—छेः छे! आपणच चला आमच्याकडे! कारण आपल्या घरीं म्हणजे आतां आमच्या मुलीच्या घरीं—म्हणतात ना, मुलगा होसतर मुली-घरीं कांहीं खाऊं नये म्हणून—

**यादव:**—हा खूप न्याय आहे बुवा! मुलामुलींच्या कर्तबगारीवर व्याह्याचं तोंड मोकळं व्हायचं! आणि आतां तर संततिनियमनाचा प्रसार जोरांत चालू आहे, तेव्हां मुलीच्या बापाचं तोंड कायमचंच बंद होणार म्हणायचं!

**बाबा०:**—खूप थट्टेखोर आहेस बुवा यादव तूं! वयाची इमारत येवढी वाढली तरी थट्टेखोरपणा जात नाहीं तुझा अजून!

**यादव:**—चालायचंच! चला.

( जातात. )

---

## प्रवेश तिसरा

( स्थळ—घराची ओटी. यमुना प्रवेश करते.)

**यमुना:**—काय बाई तरी गंमत आहे! मी आपल्या घरीं होतें, तर कोण ग बाई अगदीं कोंडल्यासारखं—जरा कुठं इकडे-

तिकडे गेलं की दादा वसकन् खेंकसून अंगावर यायचे—पण बाई इथं आल्यापासून काय पण गंमती जंमती पाहयला मिळतात! लाज नाहीं, भीड नाहीं, मर्यादा नाहीं—कांहीं नाहीं!—या वासंती-बाईच्या लग्नाला म्हणे अजून वर्षसुद्धां झालं नाहीं! इतके थोडे दिवस लग्नाला झालेले, पण नवरा बाहेरून आला म्हणून ती वासंती का उठून उभी रहाते आहे, का पदर सांवरून लाजते आहे! अहो, कांहीं म्हटल्या कांहीं नाहीं—अन् मग कसं हो यांना नवरा-बायको तरी म्हणयाचं? ( हंसते.) अन् मला गंमत वाटते आमच्या दादांची, दादा केवळ माझ्या लग्नाच्या कचाटींत सांपडले आहेत म्हणून हा धांगडधिंगा उघड्या डोळ्यांनीं पहात आहेत. नाहीं तर केव्हांच डोक्यांत राख घालून घराबाहेर पडले असते! नाहीं तर घरांतल्या घरांत चार खून तरी पाडले असते त्यांनीं एव्हांना. अन् बाई, या सगळ्यांनीं प्रीति-विवाह—प्रीति-विवाह म्हणून ध्यास घेतला आहे ती प्रीति—प्रीति ही चीज आहे तरी काय—हें आई अंबाबाई, तुलाच ग माहीत! नाहीं पण मी म्हणतें, एखाद्याचं एखादीवर—नाहीं तर एखादीचं एकाद्यावर प्रेम बसलं आणि वाटलं त्यांना नवराबायको व्हावंसं—अन् जर करतां बाई त्यांची एक-मेकांची पत्रिका नाहीं जुळली, समजा, निघालीं नवराबायको एक गोत्री—किंवा नवऱ्याचा निघाला मनुष्यगण आणि बायकोचा निघाला राक्षसगण, तर कसं बाई जमत असेल त्यांचं? का हे लोक प्रेम करायच्या अगोदर पत्रिका, गण वगैरे पहातात? एकपरी बाई गंमत वाटते या लोकांची आणि एकपरी कंटाळा येतो यांच्या वागणुकीचा! थिल्लरपणा सगळा! मला तर बाई या माझ्या लग्नाचा अगदीं कंटाळा आला आहे! आज चारपांच वर्षं आपलं माझं लग्न होतंय! अन् ‘ लांडगा आला रे लांडगा आला!’ या गोष्टीची

आठवण होते मला! लग्नाचे मुहूर्त जवळ आले कीं मारे आवई फुटते 'लांडगा आला रे आला!' म्हणून! अन् मुहूर्त संपले कीं पुन्हां शुकशुकाट! हाऽ! जांभई देत बसावं पुन्हां मुहूर्तांची वाट पहात! हा मेला माझा नवरा लपून तरी कुठं बसला आहे परमेश्वराला माहीत! बरं, या लोकांत अघळपघळ बोलून मनमोकळेपणानंही वागतां येत नाहीं—कारण जर करतां इथंच माझं लग्न ठरलं तर मग? चला, जावं न् बसावं मुखस्तंभासारखं—त्यांच्यांतच मिसळून!

( दिलरुबा प्रवेश करतो. यमुना लाजून उभी रहाते. )

**दिलरुबाः—**( स्वगत ) त्या नर्मदेचा बहुतेक राक्षसगण दिसतो आहे! कारण तिच्याशीं जरा सलगी करण्याचा प्रयत्न केला कीं तो शाळिग्राम राक्षसासारखा लागतो हुसफुस् करायला!

**'अरिना होशी मस्तानी? । कसा गे होऊं मी बाजी**
**भराऱ्या माझिया त्या—तुझ्या प्रितीविना पंगू**
**तुझा मी अन् तुंही हो माझी ।'**

—पार्जापणाचा कारभार आहे सगळा! माझ्यापुढं आतां एक कोडं येऊन पडलं आहे—ही का ती—ती का ही, का आणखी कुणी तरी? तें कांहीं नाहीं. पाहीन पाहीन–जमलं या प्रेम करण्याच्या भानगडींत कांहीं–नाहीं तर–नाहीं तर एकदम वडिलांना तारेनं कळवून लग्न उरकून घेईन आणि लग्नाच्या बायकोवरच जमलं तर प्रेम करीन! म्हाताऱ्यालाही वाटेल पोरगा निवळला म्हणून—पण म्हाताऱ्याला काय स्वप्न पडलं आहे, कीं पोराची प्रेमाची पुंगी कुठंच वाजत नाहीं म्हणून लग्नाचा बेंडबाजा वाजवायला पोरगा तयार झाला म्हणून! ( पाहून ) अरेच्या! हें मुग्ध काव्य इथंच उभं आहे का? पण

ही पोरगी अगदींच भोळीभाबडी दिसते आहे ! पहावा का हिच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करून--नाहीं तर व्हायची फट म्हणतां ब्रह्महत्या ! हिच्याशीं मी बोलायला जावं एक अन् तिनं एकाचे एकवीस करून सांगावं आमच्या ताईला कांहीं तरी भलतंच ! तेव्हां फार सावधगिरीनं बोलावं. दादापणाचा आव आणून आतां तिला 'ताई' म्हणून हांक मारतों, (उघड) ओ हो, यमुनाताई, तुम्ही इथंच उभ्या आहांत वाटतं—कां, अगदी एकट्याशा ? कां, करमत नाहीं वाटतं तुम्हाला आमच्या या घरांत ?

**यमुनाः**--इश्य ! ( जाऊं लागते,–पण थांबते. )

**दिलरुबाः**--( स्वगत ) शी–शी—घाण झाली सगळी ! या जुन्या वळणांच्या पोरींच म्हणजे इश्य, अगबाई, हे काय गडे, वगैरे वगैरे आढेवेढे ! कधीं प्रेमानं मोकळ्या ढाकळ्या बोलतील---व्हायचं नाहीं ! पण निराश नाहीं होतां कामा—जें होणं शक्य नाहीं तें आपण करून दाखवलं पाहिजे ! ( यमुनेकडे चोरून पहात ) अरे वा ! ही तर आपल्या गळ्यांतील हिरव्या पोतीच्या दुडेशींच खेळते आहे,—आतां, काय ही दुडेशी खेळतां खेळतां–ती दूड तोंडांत घालणार आणि एका हातानं नखं खायला लागणार कीं काय ? म्हणजे आमचं 'प्रियादर्शन' रोमँटिकच होणार ! (उघड) काय यमुनाताई, झाले तुम्हांला चारपांच दिवस आमच्याकडे येऊन—अजून कांहीं तुम्ही मोकळ्या ढाकळ्या बोलायला नाहीं लागलात ?

**यमुनाः**—इश्य ! मोकळं ढाकळं तें काय बोलायचं ? आमची आपली बाई जुनी चालरीत ! इकडे तिकडे बोलायचा नुसता विचार आमच्या मनांत आला तरी जीव घामाघूम होतो आमचा !

**दिलरुबाः**—अन् समजा, तुमचं लग्न एखाद्या नव्या चाली-रीतीच्या माणसाशीं झालं तर मग कसं होणार ?

**यमुनाः**—तो पुढचा प्रश्न.पण मला बाई या दोनचार वर्षांच्या अनुभवावरून माझं लग्नच मुळीं होईल का नाहीं असं वाटायला लागलं आहे !

**दिलरुबाः**—छेः छेः ! असं कुठं झालं आहे ? अहो, जीं माणसं जिवंत आहेत, मग त्या मुली असोत अगर मुलं असोत, त्यांचं लग्न झाल्याशिवाय राहिलं आहे कुठं ? कांहीं तरीच बोलतां झालं ! बाकी तेंहि खरंच. जगाचा अनुभव नाहीं तुम्हाला अजून फारसा, म्हणून असं वाटतं तुम्हाला ! पण मी अगदीं खात्रीनं सांगतों—या वर्षी तुमचं लग्न होणार—अगदीं खात्रीनं सांगतों—तुमचं आणि माझंही—हो, या वर्षी दोघांचींहि लग्नं होणार !

**यमुनाः**—कशावरनं ? आपणा दोघांनाही लग्नं व्हावींशीं वाटतात, म्हणून होय ?

**दिलरुबाः**—छेः छेः, तसं बिलकूल नाहीं ! अहो तसं पाहूयला गेलं तर मला या वर्षीच काय पण आजन्म लग्न करायचं नाहीं. पण मी अलीकडे केला आहे ज्योतिषाचा अभ्यास सुरू—शिवाय एकदोन निष्णात ज्योतिषीही माझ्या चांगल्याच परिचयाचे आहेत, त्यांनीं अगदीं पैजेवर सांगितलं आहे मला कीं बेट्या, तूं मनांत काय वाटेल त्या कल्पना कर—पण या वर्षी तुला गुरु आहे अकरावा आणि शिवाय त्याचं आहे तुझ्या जायास्थानावर लक्ष—शिवाय चंद्रबळही चांगलं आहे—तेव्हां तूं ओढून कितीही चंद्रबळ आणलंस तरी तुझं लग्न याच वर्षी ! अन् शिवाय तुला बायकोही बेतासबात शिकलेली–जरा गांवढळच—अशी मिळणार ! पाहूं या आतां काय होतंय तें ! हं, अजून तुमच्या लग्नाचं नाहीं वाटतं

जमत कुठं कांहीं? आपल्या हातांत असतं तर आपण एक मिनिटांत तुमचं लग्न जमवून टाकलं असतं!

**यमुना**:—अगबाई, हें काय, पावलं कुणाचीं वाजताहेत--दादा आले कीं काय?

**दिलरुबा**:—कोण, कोण? आमची वासंतीताई तर नव्हे—

**यमुना**:—( पडद्यांत पाहून ) शूऽक शूऽऽक! मांजर होतं मेलं खडबडत तिथं; नाहीं तर मला किनई बाई आतां अशी धास्ती वाटली कीं दादा आले कीं काय!

**दिलरुबा**:—हो, मीही घाबरलोंच होतों--म्हटलं ताई आली कीं काय! बाकी मला येवढं भ्यायचं कांहींच कारण नाहीं, म्हणा!

**यमुना**:—हं, तेंही खरंच--तुम्हा पुरुषांना काय दाही दिशा मोकळ्या! कसली लाज नाहीं--भीड नाहीं—

**दिलरुबा**:—हो, हो, थांब जरा—मी कांहीं अगदींच तशांतला नाहीं!

**यमुना**:—हो, चला--सगळे पुरुष मेले इथून तिथून एक--सारखेच!

**दिलरुबा**:—अस्सं का? काय केलं असं पुरुषांनीं?

**यमुना**:—सांगूं का—नाहीं तर म्हणाल आचरट आहेस झालं!

**दिलरुबा**:—छेः छेः असं उघडाउघड म्हणेल का कुणी?

**यमुना**:—परवां बाई मी रस्त्यानं सहज चाललें होतें--आणि माझ्या मनांत या तुम्हा पुरुषांच्या कावेबाजपणाची कल्पना आली आणि वाटलं, काय द्वाड आहेत हे पुरुष!

**दिलरुबा**:—काय बुवा अशी पुरुषांच्या कावेबाजपणाची कल्पना?



**दिलरुबाः**—सोडोनि हा अबोला— ( पृ. ६७ )

**यमुनाः**—मला बाई सांगतांनासुद्धां अगदीं संकोचल्यासारखं वाटतंय !

**दिलरुबाः**—पण करा झालं आतां धारिष्ट !

**यमुनाः**—हो, पण बाई हंसू नका हं—

**दिलरुबाः**—छट् ! अगदीं एखाद्या मनोऱ्यासारखा उभा रहातों ! हं सांगा—

**यमुनाः**—वाटलं—पण मी नाहीं बाई सांगत—!

**दिलरुबाः**—आतां किती वेळ सांग सांग म्हणूं ! (स्वगत) झटकन या बोलण्याच्या ओघांत 'प्रिये म्हणून' म्हणून घेऊं का ? पण नको—आस्ते कदम चालना ! (उघड) हें पहा, माझी उत्कंठा अगदीं पुरेपुर वाढली आहे !

[ कवाली—त्रिताल ]

**सोडोनि हा अबोला। वद गोड गोड बोला ॥धृ०॥**
**आतुर अंतराला। बघ हा चकोर झाला ॥**
**वर्षोनिवाक्सुधेला। झणिं शान्तवी तयाला ॥ १ ॥**
**उफलोनि ओष्ठ कमला। मकरंद चाखण्याला ॥**
**मन-भृंग हा भुकेला। झणिं शान्तवी तयाला ॥ २ ॥**

बस्स ! पुरे झाले आढेवेढे आतां ! येवढा आढयावेढयाचा डोंगर उभा केला आहेस तो कोणत्या कल्पनेचा उंदीर बाहेर पडतो आहे तो पाहूं दे तर खरं !

**यमुनाः**—सांगतें हं, पण मला बाई लाज वाटतीय !

**दिलरुबाः**—अग, आतां काय जीव देऊं तुझ्यापुढं ? हें बघ, आतां तुला फारच लाज वाटत असली तर कल्पना कर—मी

पुरुष नसून—एक बाई अगदीं तुझ्या जिवाभावाची मैत्रीण तुझ्याजवळ उभी आहे! हं सांग गडे तुझी कल्पना--

**यमुनाः**—इश्श! भारीच बाई आचरट आहांत तुम्ही! पण आतां अगदीं काय वाटेल तें होवो, सांगतेंच हं मी ती कल्पना! अहो, परवां काय झाली गंमत--मी रस्त्यानं सहज चाललें होतें, तर मेलीं दोनचार पोरं माझ्याकडे टकमक पहात चाललीं होतीं! तीं पोरं पुढं गेलीं तरी मागं वळून पाहिलं त्यांनीं! मला वाटतं माझ्या गळ्यांतल्या या हिरव्या पोतीवरून त्यांना खास समजलं असाव कीं माझं लग्न अजून व्हायचं आहे म्हणून--

**दिलरुबाः**--मग यांत पुरुषांचा कावेबाजपणा कुठं आला?

**यमुनाः**—अहो, माझ्या गळ्यांतल्या हिरव्या मोतीवरून माझं लग्न झालं नाहीं हें त्यांना पक्कं समलं—पण माझा बाई आपला अंदाजच—त्यांचं लग्न झालं होतं का नाहीं—हें कांहीं मला कळलं नाहीं! लग्न न झाल्याची आमच्याजवळ जशी हिरव्या पोतीची खूण—तसं तुमच्याजवळ आहे का कांहीं? म्हणूनच म्हणतें पुरुष कावेबाज म्हणून.

**दिलरुबाः**—ओ यस्--हा एक भयंकर स्वरूपाचा सामाजिक अन्याय आहे खराच! माझ्याही इतक्या दिवसांत तो लक्षांत आला नव्हता! अरेरे, थोडक्यांत चुकलं! शारदा-बिल पास व्हायच्या आंत जर हें माझ्या लक्षांत आलं असतं, तर लग्न न झालेल्या पुरुषांनीं एक एप्रीलपासून गळ्यांत हिरवी दूड घालण्याबद्दल कायदा पास करून घेतला असता! पण जाऊं द्या—पुन्हां तशी एखादी संधी मिळेपर्यंत मी आपलं तुम्हालाच विचारतों; यमुनाताई, पुरुषांनीं लग्न होईपर्यंत काय हिरवी दूड गळ्यांत घालावी, का लग्न होईपर्यंत जानवींच हिरवीं करावींत—काय?

**यमुनाः**—छेः ! येवढंसुद्धां नको करायला ! मी म्हणतें, पुरुष एर्वीतेवीं मिशा काढतातच--त्या लग्न होईपर्यंत तरी काढूं नयेत म्हणजे झालं.

**दिलरुबाः**—अगदीं रामबाण उपाय शोधून काढलात ! ( स्वगत–गांवढळ म्हणतां म्हणतां हिच्यांतही काव्याची चमक आहे ! बाकी हें काय सांगायला हवं—मुलगी म्हटली कीं काव्य आलंच !

**यमुनाः**—बरं बाई, जातें आतां मी—हो, पण खरंच का आपण ज्योतीष शिकताय हल्लीं—

**दिलरुबाः**--हो, खरंच—

**यमुनाः**—इश्य, माझी तरी पत्रिका पहा, अगबाई, पण आलं वाटतं कोणी तरी इकडेच ! ( जाऊं लागते.)

**दिलरुबाः**--थांबा--थांबा, जरा थांबा--आहे का तुमच्या-जवळ तुमची पत्रिका--

**यमुनाः**--नाहीं बाई, दादांच्या नकळत त्यांच्या डायरींतून उतरून आणून देईन मी तुम्हांला--पण अगदीं खरं खरं सांगा हं !

**दिलरुबाः**--हो, हो हो—ऽहो ! ( तिच्याकडे पहात उभा रहातो. )

**यमुनाः**--इश्य, असं काय करतां अगदीं एखाद्या ह्याच्या-सारखं ! (जाते.)

**दिलरुबाः**—इश्य ! काव्य आहे, रोमान्स आहे, स्वतंत्र कल्पना आहे आणि अद्याप तिचं लग्न व्हायचंय—तेव्हां आशा करायला जागा आहे ! आतां तिला कुठलं राहवायला—ती केव्हां तरी आजच्याआज पत्रिका आणून दाखवणार मला—पण नर्मदा—पण नर्मदेच्या पाठीमागं तो शाळिग्राम दिसतोय—तिथं या दिल-

रुब्याची तार तुटणार ! पण नाद नाहीं सोडतां कामा ! ही नाहीं तर ती—ती नाहीं तर ही—एकवार वाटतं नर्मदेशीं लग्न करावं, एकवार वाटतं या यमुनेशीं लग्न करावं, अन् एकवार वाटतं लग्नच करूं नये. नुसतं ही का ती, ती का ही असंच करीत फिरावं ! त्यांतच रोमान्स आहे !

( जातो. )

---

## प्रवेश चवथा

( स्थळ—स्टेशनजवळील रस्ता. दादा प्रवेश करतात. )

**दादा०**:—आतां मात्र कहर झाला ! अरे काय, आहे काय नाहीं काय, कांहीं वागणुकीला ताळमेळ ! व्यक्तिस्वातंत्र्य बरं हें व्यक्तिस्वातंत्र्य ! दोघांचं प्रेम एकाच मुलीवर–त्या नर्मदेवर—आणि त्या बिचारीचं प्रेम कुठं आहे तें त्या परमेश्वराला माहीत ! आणि अलीकडे प्रेमाचं प्रदर्शन प्रेमचिठ्ठीशिवाय होत नाहींसं झालं आहे ! पण या प्रदर्शनामुळं 'लेखी पुरावा' तयार होऊन यांचा सांवळागोंधळ बाहेर पडायची वेळ येते, हें एकपरी बरं आहे ! अगदीं झक् मारली आणि या वसंतराव काळ्यांकडे आलों. अहो त्यांच्या घरीं कुणाचा कुणाला मुळीं कांहीं पत्ताच नाहीं ! तो शाळिग्राम एकीकडे म्हणतो—माझ्या मुलीशीं लग्न करायला तयार आहे म्हणून—म्हणून त्या नर्मदेची दिलरुब्याला आलेली चिठ्ठी सहज माझ्या हातीं लागली, ती त्या शाळिग्रामपंतांना दिली; म्हटलं त्या चिठ्ठीमुळें तरी त्यांना नर्मदेबद्दल खरीखुरी कल्पना येईल—आणि तो झटकन् माझ्या मुलीशीं लग्न करायला तयार होईल–पण झालं

कांहीं तरी भलतंच! ती चिठ्ठी मी त्याला दिल्यापासून--चिठ्ठी कुठं मिळाली--कशी मिळाली--केव्हां मिळाली! प्रश्नांवर प्रश्न! बरं, मी त्याला उत्तर देण्याचा प्रयत्न केला पण समाधान नाहीं! शेवटीं 'भीक नको पण कुत्रा आवर' म्हणण्याची पाळी येण्याचा जेव्हां रंग दिसूं लागला, तेव्हां सामानसुमान कांखोटीला मारून पळता पाय काढला त्यांच्या घरांतून! गाडीलाही अजून तासभर अवकाश आहे--तेव्हां यमूला केली सामानाजवळ उभी आणि चंचींतलीं पानं संपली तीं घेण्याकरितां निघालों! चला--काढायचा कसा तरी आतां तासभर!

( शाळिग्राम एका हातांत दादांची ट्रंक, वळकटी घेऊन येतो. यमुनाही त्याच्या मागोमाग येते.)

**दादा०:**--अहो, अहो संभावित--काय हें? काय ग यमू. अहो शाळिग्रामपंत, काय डोकं फिरलं काय आपलं? आणा ती ट्रंक-वळकटी इकडे--जाऊं द्या आम्हाला--

**यमुना:**--अहो दादा, हे आपले आले आणि म्हणतात 'पुन्हां घरीं परत जायचं ठरलं आहे; चला, सामानसुमान मी घेतों!' म्हणून सामानसुमान काखोटीला मारून--लागले चालायला! इश्य, काय बाई तरी हीं माणसं--

**दादा०:**--अहो साहेब, हें मांडलायत काय तुम्ही? आम्ही गाडीचीं तिकिटं काढून ठेविलीं आहेत--हें काय चालविलं आहेत तुम्ही? आणा ती ट्रंक-वळकटी इकडे--जाऊं द्या आम्हाला--नाहीं तर आणखी जर कांहीं दिवस आपल्याकडे मुक्काम झाला आमचा, तर पुन्हां परत घरीं जाण्याच्याऐवजीं वेड्याच्या इस्पितळांत जायची वेळ येणार आम्हाला!

**शाळिग्रामः**—हें पहा, वेळा सांगून येत नसतात ! आपल्या मुलीच्या भाग्योदयाची वेळ आली आहे आतां !

**दादा०ः**—हं, आचरटासारखं काय बोलतां ? मी आपली मुलगी तुम्हाला द्यायला आतां साफ तयार नाहीं !

**शाळिग्रामः**—अहो पण दादा--

**दादा०ः**—पणबीण कांहीं नाहीं ! जमायचं नाहीं तें आतां !

**शाळिग्रामः**—अहो तें न जमूं द्या, माझ्याशीं नव्हे, दुसरं एक स्थळ आहे—आतां वाटेल तुम्हाला चावटपणा पण मग म्हणाल कीं बस्स--हाच योगायोग जमायला पाहिजे होता ! आतां असं करा, आपण परत जाऊं आपल्या बिऱ्हाडीं, कुणी विचारलं तर सांगायचं गाडी चुकली म्हणून--हं, काय समजलेत ?--

**दादा०ः**—अहो पण हें आहे काय--म्हणतील काय लोक ? माझा म्हातारचळ कीं तुमची गद्धेपंचविशी ?

**शाळिग्रामः**—हें पहा दादा, हा व्यक्तिस्वातंत्र्याचा काळ आहे; तेव्हां लोकांच्याबद्दल आपण विचार करायचा नाहीं !

**दादा०ः**—छे, छे बुवा, जाऊं द्या मला, झाला येवढा पोरकटपणा पुरे झाला !

**शाळिग्रामः**—अहो तुम्ही पुष्कळ जाल, पण मी जाऊं दिलं पाहिजे ना तुम्हाला--(स्वगत) ह्या म्हाताऱ्याला तसा कसा परत जाऊं देऊं—आमच्या या रोमँटिक नाटकांत मूर्खाचा अचानक प्रवेश होऊन--हास्यरसांत भयानक रस सुरू झाला. ह्या म्हाताऱ्याकडून मोठ्या खुबीनं--ती चिठ्ठी याला कशी सांपडली, कुठं सांपडली —शिवाय यांनीं आणखी कांहीं पाहिलं का, याचा सविस्तर उलगडा करून घेतला पाहिजे.

**दादा०**:—नाहीं पण याचा अर्थ काय, आमचीं तिकिटं फुकट जातील तीं—

**शाळिग्राम**:—मी देईन त्यांचे पैसे तुम्हाला—

**दादा०**:—पण घरीं जाऊन करायचं काय—

**शाळिग्राम**:—तेंच तर तुम्हाला सांगतों. आतां असं करा—वसंतरावांचं घर स्टेशनच्या जवळ आहे हें आज आपल्या पथ्यावर पडलं. तेव्हां आपल्या मुलीला सांगा पुढं जायला. म्हणजे मी आपल्याला असं अडवणुकीनं परत कां आणलं, त्यांत आपला कसा फायदा आहे हें एक मिनिटांत आपल्या लक्षांत येईल.

**दादा०**:—बरं यमुने—सांपडेलना तुला घर—हो तूं पुढें, मी आलोंच—कुणी विचारलं तर सांग गाडी चुकली म्हणून—

**यमुना**:—बरं! ( स्वगत ) हें बाई आहे तरी काय—इकडे चला नी तिकडे चला—उलगडाच होत नाहीं मुळीं कोणच्या गोष्टीचा! अखेर माझं लग्न व्हायचंय का नाहीं? हें असं आहे, शिकलेल्या मुली—प्रेमाचा फाजील पाचकळपणा करतात तर आम्ही आडाणी मुली म्हणजे दरवेशाच्या हातांतल्या अस्वली—दोरी हालेल त्याप्रमाणं नाच करायचा. पण येवढं खरं कीं दादांनीं मला ज्यांना दाखवायला म्हणून आणली ते कांहीं हे नव्हत! एकपरी बाई बरं झाल परत यावं लागलं तें, वासंतीच्या भावाला पत्रिका दाखवून आपल्या नशिबीं काय काय आहे तें तरी कळेल! चला, जावं नी बसावं घरांत! ( जाते. )

**दादा०**:—हं, सांगा ना आतां—' अरेबियन नाईट्स् ' मधील एखादी सुरस आणि चटकदार गोष्ट!

**शाळिग्रामः**—आतां पहिली गोष्ट म्हणजे अशी सांगायची कीं--आपण आपल्या लग्नाच्या मुलीला घेऊन आल्याचं पाहून वसंतरावांनीं तुमची थट्टा करण्याच्या हेतूनं तुम्हाला सांगितलं कीं-मी त्यांचा मेव्हणा आहें, पण खरा मी त्यांचा मेव्हणा नसून मित्र आहे!

**दादा०ः**--आंऽ! मी तरी मीच आहे का? का थट्टाच सगळी—बरं, मग त्यांचे खरे मेव्हणे कोण?

**शाळिग्रामः**—ते दुसरे गृहस्थ--दिलरुबा ऊर्फ भाऊसाहेब!

**दादाः**—आतां तरी हें खरं का? का अजून थट्टाच! नाहीं तर पुन्हा एखादे वेळीं सांगाल कीं वसंतराव हा वासंतीचा भाऊ आणि त्याचंच लग्न व्हायचंय अजून!

**शाळिग्रामः**—छे हो! प्रत्येक वेळेला थट्टा करील का कुणी?

**दादा०ः**—कांहीं नेम नाहीं सांगतां येत तुम्हा पोरांचा--

**शाळिग्रामः**—तेव्हां आतां असं करा, तुम्ही परत चला. गाडी चुकली असंच सांगा सगळ्यांना--मी ही गोष्ट तुमच्या-जवळ बोललों—मी वसंतरावांचा मेव्हणा नसून मित्र आहें ही गोष्ट आपल्याला कळली आहे, असं बोलायचं नाहीं कुणाजवळ--काय समजलांत?

**दादा०ः**--पूर्ण समजलों--कीं मी एका संभावित ठगांच्या टोळींत येऊन सांपडलों आहें.--अब्रूनिशीं यांतून बाहेर पडलों म्हणजे मिळवली! पण काहो, एक शंका येते मला--ते दिलरुबा का भाउसाहेब कोण लग्नाचे आहेत ते—ते तर परवां--त्या नर्मदा-बाई आणि ते अगदीं गळ्यांत गळा घालून हिंडत होते

एका बागेंत ! तेव्हां याचा मेळ कसा घालायचा ? आणि शिवाय परवां--आपण त्या नर्मदाताईशीं चहाटळपणा करीत होतां त्या वेळेला मी आपल्याला चिठ्ठी दिली त्याचा अर्थ काय ?

**शाळिग्रामः**—(स्वगत) काय नर्मदा आणि दिलरुबा गळ्यांत गळा घालून हिंडत होतीं ? शंकाच नको. त्या पत्राची साक्ष आहे कीं यांच्या बोलण्याला ! काय करावं--पण--ह्या संशयावर व या थेरड्याच्या बोलण्यावर आपण विसंबून असतां कामा नये. प्रत्यक्ष नर्मदेलाच एकीकडे गांठून छडा लावला पाहिजे. नाहीं तर—तें कांहीं नाहीं, पुरे झाला रोमान्स--आज संध्याकाळच्या गाडीनं जावं परत आपल्या गांवीं ! (उघड) हें पहा—दादा, तुम्ही आम्हा शिकलेल्या लोकांकडे फारच संशयी मुद्रेनं पहातां बुवा ! अहो मी तुम्हाला आणखी एक नातं सांगायचं विसरलों.

**दादा०ः**—अस्सं ! एक नाहीं तर काय सांगायचीं राहिलीं असतील तेवढी सगळी नात्यांची दावण एकदम सांगा पाहूं !

**शाळिग्रामः**—थट्टा नव्हे--अहो, तो दिलरुबा आणि नर्मदा--हीं दोघं बहीणभावंडं आहेत. हा तिचा आतेभाऊ आणि ती त्याची मामेबहीण--

**दादा०ः**—हें दिलंत त्यांच्या सलगीचं कारण सांगून ! आणि तुम्ही तिच्याशीं एकान्त करीत त्या दिवशीं बसलां होतांत तर सांगा कीं ती माझी लग्नाची बायको आहे म्हणून ! कां, कमी कां करतां--आतां अजून नर्मदेचं लग्न व्हायचं आहे ही गोष्ट निराळी !

**शाळिग्रामः**—दादा, तुम्ही फारच थट्टा करतां बुवा--अहो, तुम्ही आल्याबरोबरच मी नाहीं का तुम्हाला सांगितलं, कीं वसंतराव माझं तिच्याशीं लग्न ठरवताहेत म्हणून--

**दादा०**ः—म्हणजे तें तेवढं त्या वेळेला खरं बोलल्लांत वाटत ! अस्सं, बरं चला घरीं. रस्त्यांत किती वेळ बोलत उभे रहाणार आतां ? आणा ती ट्रंक, मी घेतों.

**शाळिग्राम**ः—नको, चला ! मीच तुम्हांला त्रास दिला आहे परत येण्याचा तेव्हां मीच निस्तरतों. ( ट्रंक , वळकटी घेऊन जाऊं लागतो इतक्यांत यादवमामा प्रवेश करतात. हातांत हॅंडबॅग. )

**यादव**ः—(स्वगत) या पोरांनीं इकडे काय घोटाळा माजविला आहे हरि जाणे ! तेव्हां आपण अगोदर त्यांची थोडीशी आजु-बाजूला चवकशी करावी आणि मग वसंतराव काळ्यांकडे सरळ जावं. ( समोर पाहून ) कोण, शाळिग्रामपंत. आमचे भाचेजांवई ! आणि हमालासारखे हातांत ट्रंक वळकटी घेऊन कुठं जाताहेत ? आं—कांहीं जादूगिरी तर नव्हे ही ! मी अरेबियन नाईटमध्यें वाचलंय कीं, पूर्वी जादूगार माणसाचीं कुत्रीं करून आपल्याबरोबर राजरोसपणं त्यांना वागवीत ! तसं त्या बरोबरच्या म्हाताऱ्यानं—आमच्या जांवयांना सुशिक्षित हमाल बनवला कीं काय ? चला, पण नक्की ते शाळिग्राम-पंतच का ? पण त्यांच्या अंगावरून सरळ जाऊन पुरती खात्री करून घ्यावी. (त्या उइंगपासून त्या उईंगपर्यंत जातो. शाळिग्राम त्यांना पहातो व हातांतील ट्रंक, वळकटी खालीं ठेऊन अजागळासारखा उभा रहातो. )

**शाळिग्राम**ः—( स्वगत ) आं ? कोण यादवमामा कीं काय—माझ्या व नर्मदेच्या वडिलांना गेलेल्या पत्राचं उत्तर कीं काय हें ? मग मात्र पुरी फजिती—कारण आम्ही एक नाटकी तर यादवमामा म्हणजे सवाई नाटकी ! हे अर्धनारीनटेश्वरा, या आम्हा संकटांत सांपडलेल्या नवराबायकोवर तुझा पूर्ण कृपा-शीर्वाद असूं दे आणि आम्हांला या संकटांतून सुटूं दे ! हं, यादव-

मामाच ते. ( उघड ) यादवमामा--अहो यादवमामा ! ( ते तसेच पुढें जाऊं लागतात. ) हं ! आहेत खरे आमच्याही सवाई ! हे पुढं अगोदर गेले तर करणार आणखी कांहीं तरी घोंटाळा ! तेव्हां त्यांना इथं वाटेंतच गांठलं पाहिजे अगोदर ! (जवळ जातो; व यादवरावांना अडवून ) अहो मामासाहेब--मी हांक मारतोंय तुम्हाला, इकडे कुठं तुम्ही ?

**यादवः**--( स्वगत ) ठीक आहे. यांनीं चालविलेल्या या नाटकाचा पुरता छडा लावण्याकरितां मलाही सवाई नाटकी झालं पाहिजे ! छेः, आतां शाळिग्रामपंतांचं आणि आमचं कांहीं नातं नाहीं असाच बहाणा करून अनोळखी वाटसरू बनलं पाहिजे आपण ! (उघड) कोण, मला हांक मारलीत ? असं का ? काय बरं आपलं नांव ? ओळख आहे काय तुमची माझी ? ; अरे वा, माफ करा हं; कुठं बरं गांठ पडली होती आपली ? पण मला नाहीं वाटत आपली माझी फार वेळ गांठ पडली असेल असं--काय आपलं नांव ?

**शाळिग्रामः**—माझं नांव शाळिग्राम—

**दादा०ः**—( स्वगत ) हा कोण आणखी मामा--तो तर याला ओळखही देत नाहीं--आहे काय ही भानगड--चला रे बोवा, इथं रहाण्यांत आतां अर्थ नाहीं. हा सारा भुताटकीचा खेळ दिसतोय ! कुणालाही न कळवितां आपले पहांटच्या गाडीनं पसार व्हावं ! त्या वेळपर्यंत तरी निभावलों म्हणजे ठीक !

**यादवः**--छे बुवा, माफ करा हं ! नांवसुद्धां नाहीं ऐकल्यासारखं वाटत ! हं, तुम्ही कुणी तरी दुसराच समजलांत मला ! बरं असो, आज नवीन ओळख झाली आपली--बरं जातों, मला काम

आहे जरा ! ( स्वगत ) हं, हे एक राजश्री भेटले इथं हमाली करीत, आतां आमच्या नर्मदाताई कुठं भांडीं घांशीत बसल्या आहेत तें पाहिलं पाहिजे. ( जातो. )

**शाळिग्राम**:—म्हटलं नाहीं सवाई नाटकी म्हणून ! ओळख द्यायला तयार नाहीं ! हा आतां आमची पुरी फजिती करणार—आतां काय, जाऊं वसंताच्या घरीं, का ट्रंक वळकटी इथंच टाकून होऊं परस्पर पसार आपल्या गांवीं !

**दादा०**:—काय हो ? असे भांबावलांत काय ? पहा, अलीकडे तुम्हाला ओळखसुद्धां पटेनाशी झालीय !—भलत्यालाच भलते समजतां—ताळ्यावर आहांत ना ?

**शाळिग्राम**:—छेः ! कुठं काय ? मला वाटलं तो माझ्या माहितीचा असावा. अहो, कारण आमच्या यादवमामांच्या आणि त्यांच्या चेहेऱ्यांत किती साम्य म्हणतां—हो ! अगदीं फसवणूक होण्याइतकं ! म्हणूनच फसलों म्हणा ! बरं चला.

**दादा०**:—मग काय, चलायचं ?

**शाळिग्राम**:—हो, चला कीं !

( जातात. )

---

## प्रवेश पांचवा

( स्थळ—वसंताचा दिवाणखाना. दिलरुबा टेबलावर लिहीत बसला आहे.)

**दिलरुबा**:—आश्चर्य आहे, नर्मदेच्या व आमच्या प्रेमाची ती शकुनाची चिठ्ठी त्या म्हातारबुवांच्या हातांत कशी गेली? अहो त्यामुळं

आमचा प्रेमाचा रामबाण फुकट गेल्यासारखं झालं ! आतां काय करणार ? अखेर युक्ति शोधून काढली ! चिठ्ठींतला मजकूर माझ्या लक्षांत होताच--तिचं माझं अक्षर एक हें तर मुख्य भांडवल--त्याच मजकुराची काढली एक चिठ्ठी लिहून--पण पुन्हां विचार केला, म्हटलं,सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें ! तेव्हां कांहीं तरी चळवळ केली पाहिजे ! म्हणून त्या एकाच मजकुराच्या अर्धा डझन चिठ्ठ्या काढल्या लिहून--आतां ह्या ना त्या निमित्तानं ही चिठ्ठी प्रत्येकाच्या हातांत एक एक पडेल अशी करतों व्यवस्था--आणि अशा तऱ्हेनं सगळ्या बाजूंनीं आग भडकली कीं करतों त्यावरच प्रेमाचा लाजाहोम ! एक बरं झालं, त्या म्हातारबुवांनीं ती चिठ्ठी शाळिग्रामाच्या हातांत दिली--त्यामुळं तो आतां या बाबतींत पूर्ण निराश झालाच असेल ! पण त्या दिवशीं मात्र आली होती खरीच श्रीमुखांत खायची वेळ ! आश्चर्य वाटतं मला, प्रेम ही चीज काय आहे ? तो लेकाचा शाळिग्राम परवां गांवाहून आला--ही नर्मदा तशीच--बरं, आम्ही हीं सगळीं जिवंत माणसं सदासर्वदा आसपास असतांना त्यांचं हें प्रेम आलं कुठून--बसलं कसं आणि तीन दिवसांत अगदीं गंमत सांगण्याच्या चिठ्ठीपर्यंत मजल ! जादू आहे कांहीं तरी ! हें तर आतां निर्विवाद झालं,--ती चिठ्ठी आमच्या हातांत कांहीं तरी गफलतीनं पडली ! आणि ती चिठ्ठी पाहून आमच्या प्रेमानं पेट घेतला ! पण मजा वाटतो मला--इथं काय नर्मदेची कुणी लेखी अगर तोंडी परीक्षा घेत होतं--ते शाळिग्रामला तिचे सर्व सद्गुण पटून--शिक्षणाचीं सर्टिफिकिटं पसंत पडून--इतक्या झटपट त्यांच्या प्रेमाचा ताजमहालही तयार झाला आणि आमचं प्रेम इकडे हांका मारीत बसलं ! तें कांहीं नाहीं, हरप्रयत्नानं नर्मदेच्या नांवानं

आपल्या कपाळी मुंडावळ्या बांधून घेतल्या गेल्याच पाहिजेत! आतां वेळ प्रसंग पाहून या 'प्रेम-पत्रिके'च्या पेरणीला करतों सुरुवात--पाहूं या काय पीक येतं तें!

( वासंती येते.)

**वासंतीः**—काय रे भाऊ, घरीं नाही का कुणी?

**दिलरुबाः**—म्हणजे, मी म्हणजे कुणीच नव्हे वाटतं?

**वासंतीः**—आचरट आहेस झालं!

**दिलरुबाः**—ताई, मोठेपणाचा फार फायदा घेतेस बुवा तूं!

**वासंतीः**—त्याचं कारण तूं तसाच आचरट आहेस! तूं आहेस हें पाहूनच मी तुला विचारतें आहें--घरांत कुणी नाही का म्हणून—याचा अर्थ तुला कळूं नये वाटतं? बरं, पत्रं वगैरे आलीं आहेत का आज कुणाचीं?

**दिलरुबाः**—होय, तुझ्या नांवचीं आहेत कीं एकदोन! ( दोन पाकिटें व त्यांतच एक कोरें गुलाबी पाकीट घेऊन त्यांत स्वतः हातानें लिहून तयार केलेली प्रेम-पत्रिका घालतो व अशीं तीन पाकिटें वासंतीच्या हातांत देतो.)

**वासंतीः**—काय रे भाऊ, हें उघडंच पाकीट कुणाचं?

**दिलरुबाः**—( एकदम घाबरलों आहे असें दाखवून ) अरे! ताई आण आण तें इकडे, माझं आहे तें प्रायव्हेट!

**वासंतीः**—अगदीं माझ्यापासूनसुद्धां लपवून ठेवण्यासारखं? ( असें म्हणत ती चिठ्ठी वाचते.) काय हो भाउराव?

**दिलरुबाः**—मला काम आहे बाहेर, हा अस्साच्याअस्सा जाऊन आलों हं ताई--( घाईघाईनें कोट टोपी कशीबशी डोक्यावर ठेवून बाहेर जातो.)

**वासंतीः**--अगबाई, हें काय पहातें आहे मी? नर्मदेची चिठ्ठी आणि माझ्या भावाला? बरीच किं ग आहेस! येऊं दे आतां नर्मदेला! अन् मला कसा बाई सुगावा लागला नाहीं या गोष्टीचा? आमचे भाउरावही बरेच पाताळयंत्री आहेत कीं!

[ राग—कॉफी, ताल—त्रिताल ]

**कपटी कशा करिसी कृतीला।**
**ध्यान धरुनि बक जलतीराला ॥ ध्रु० ॥**
**दिससी भला, वरी तूं जनाला।**
**कितिक करिसी परि नटसम लीला ॥ १ ॥**

मला हें माहीत असतं तर मी कशाला लिहिलं असतं नर्मदेच्या वडिलांना पत्र? अहाहा, आणि भाऊ काय लगबगीनं गेला पण बाहेर! अरे गुलामा, पण अगोदर नर्मदेला खालीं गांठतें आणि विचारतें, वहिनीबाई—लग्नचिठ्ठया कधीं द्यायच्या छापायला? का आम्हालाही वगळायचा विचार आहे! आधीं आतां तिला खालीं जाऊन गांठते--पाहूं या कांहीं दाद देते आहे का—साधी साधी म्हणतां म्हणतां बरीच पाताळयंत्री आहेस किं ग! ( जाते. )

( दिलरुबा प्रवेश करतो. )

**दिलरुबाः**--( स्वगत ) पहिला बाण तर बरोबर लागला! पाहूं या आतां काय होतंय तें! आतां वसंतरावांच्या हातांत एक चिठ्ठी पोहोंचविली पाहिजे. पण ती कशी पोहोंचविणार? सध्या माझे ग्रह उच्चीचे दिसत आहेत! हे पहा आलेच वसंतराव!

( वसंत येतो. )

**वसंतः**—काय, भाउसाहेब—बाहेर नाहीं गेलांत आज कुठं?

**दिलरुबाः**--घरांत कोणीच नव्हतं म्हणून बसलों घर

सांभाळीत ! तुम्ही बसताय ना आतां घरांत--मी जरा बाहेर जाऊन येतों.

**वसंत**:--या कीं, मी आहेंच आतां घरांत. जातांना तेवढा घरांत चहा करायला सांगा हं--तुमचा झाला कीं नाहीं अजून ?

**दिलरुबा**:--मो घेतला आतांच ! अरे वा, कोट अगदी परटीला द्यायला झाला बुवा ! तें कांहीं नाहीं, आतांच बदलला पाहिजे ! ( नवीन कोट काढतो व पहिला अंगांतून बाहेर काढून नवीन अंगांत घालतो व काढलेल्या कोटांतील सामान बाहेर काढण्याच्या मिषानें वासंतीच्या हातांत दिल्याप्रमाणें एक प्रेमचिठ्ठी असलेलें गुलाबी पाकीट--घाईत पडल्यासारखें खालीं टाकतो व गुंह्या घालीत घालीत निघून जातो.)

**वसंत**:--अहो--भाउसाहेब, हें पहा पत्र पडलं तुमचं कसलं तरी--गेले वाटतं ? आज दोनतीन दिवस मी मजा पहातों आहें या भाऊसाहेबांची ! घरांत त्या दोन मुली आल्यापासून--भाउ-साहेब घरांतनं कांहीं फारसे हालत नाहींत--

[ राग--देस, ताल--त्रिताल ]

**प्रणयासी भुलुनि किती मूढ खचित हा झाला ।**
**करी कोपेसम लीला, नच गणतोही तयाला ॥ धृ० ॥**
**बघुनि निकटीं नव सुंदर बाला, भुलुनि मानस गेला ॥**
**भ्रमण करित जगुं भ्रमर भोंवतीं मधु-रस चाखायाला ॥**

अशीं हीं आशाळभुतं आणि म्हणे आम्हांला कोर्स कंप्लीट झाल्याशिवाय लग्न करायचं नाहीं ! ( पत्र उचलून पहातो व वाचतो. ) आं ! वा रे भाउसाहेब ! हा कोर्स घेतलात का अखेर तुम्ही--छेः बुवा, आपला नाहीं विश्वास बसत या चिठ्ठीवर ! नर्मदा

म्हणजे काय चणचणीत आणि हुशार; आणि ती या अजागळाला प्रेमचिठ्ठी लिहिणार--आश्चर्य आहे ! पण प्रत्यक्ष चिठ्ठीच पुढं आहे तेव्हां विश्वास ठेवायला पाहिजे ! हं ! मग आमचे शाळिग्राम-पंत उगाच मिटक्या मारीत आहेत कीं काय ? छेः, पण तसं नाहीं वाटत. जरा बारीक नजर ठेवली पाहिजे ! ( चिठ्ठी खिशांत घालतो. ) या प्रेमाच्या धांगडधिंग्यापेक्षां बाहुलाबाहुलीसारखीं लग्नं होत तींच बरीं म्हणण्याची पाळी आली आहे ! चला, दिवाळीची सुट्टीही संपत आली ! शाळिग्राम कुठं भटकतो आहे त्याचा पत्ता नाहीं-वासंतीची मैत्रीणही गांवांतच तिच्या दुसऱ्या मैत्रिणीला भेटण्याचं निमित्त करून बाहेर पडली आहे, आपण तरी घरांत बसून काय करणार आतां ? खालींच जाऊन चहा घ्यावा आणि वासंतीला बरोबर घेऊन आपणही जरा सहल करून यावी ! ( जातो. )

( पुन्हां दिलरुबा प्रवेश करतो. )

**दिलरुबाः**—वा, छान लपंडाव चालवला आहे मी आज ! वसंतरावही आतांच बाहेर पडले—वासंतीताईही त्यांच्याबरोबरच फिरायला गेली आणि मी एकलकोंडा मात्र या अवाढव्य घरांत एकटा नाचतोंय बागडतोंय ! या लग्नांत फार विघ्नं येतात बुवा ! नकटीच्या लग्नाऐवजीं-प्रेमाच्या लग्नालाच फार विघ्नं येतात हल्लीं ! मी प्रेम करायला तयार आहें तर माझ्यावर प्रेम करायला कुणींच तयार नाहीं ! ही प्रेमाची काय भानगड असते हें मदनान्तका-शंकरा तुलाच माहीत ! जरा बरीशी पोरगी दिसली कीं मी अगदीं हिरो-लाइक ॲक्शन्स करतों पण एकही पोरगी माझ्याकडे पाहून—

**—मला मदन भासे हा मोही मना**—असें म्हणत नाहीं ! हा काय न्याय आहे ! का मी पुरुषच नाहीं ? अरे, काय आहे काय भानगड ही ! त्या परमेश्वराला तरी एवढी ‘ स्त्री-पुरुष ’ अशा

दोन जाती निर्माण करण्याची कांही जरूरी होती? अर्धनारी नटेश्वरासारखी 'स्त्रीपुरुषान्तर्गत' एकच जात परमेश्वरानं निर्माण केली असती तर सगळे सामाजिक प्रश्न आपोआप सुटले असते! आतां मजा पहा, ती मुग्ध कलिका यमुना, काल कुठं थोडंसं संधान बांधीत होतों तों आज पसार; गेली आपल्या गांवीं! गेला सगळा प्रयत्न फुकट! आतां राहिली नर्मदा-- ( यमुना प्रवेश करते.)

**दिलरुबाः**--हें काय, तुम्ही कुठं पुन्हां परत इकडे?

**यमुनाः**—गाडी चुकली आमची म्हणून परत आलें! आतां चार दिवस आणखी मुक्काम आहे आमचा! अगदीं थोडक्या वेळाकरितां आगगाडी चुकली हो!

**दिलरुबाः**—(स्वगत) बरी त्या आगिनगाडीला तरी आमच्या प्रेमाची कींव आली! (उघड) हो, बरं झालं मगाशीं तुम्ही गांवी निघून गेल्याचं कळलं मला. फार वाईट वाटलं मला.

**यमुनाः**—मलासुद्धां फार वाईट वाटलं! पण दादा म्हणाले चला, मग काय बाई निघणंच आलं! आतां आपली गाडी चुकली म्हणून पुन्हां गांठ पडली! माझी पत्रिका पहाणार होतांत ना आपण—ही पाहिलीत का मी मुद्दाम दादांच्या डायरीतून टिपून आणली आहे. ( पत्रिका देते.)

**दिलरुबाः**—( पत्रिका घेत ) बरं, मग मी उद्याला सांगेन आपल्याला--

**यमुनाः**—अगदीं खरं खरं सांगा हं--नाहीं तर आपलं दारावरच्या कुडमुड्या ज्योतिष्यासारखं सांगाल कांहीं तरी--

**दिलरुबाः**—छे! छे! मला काय तुमच्यापाशीं पैसे का मागायचे आहेत! मुख्य प्रश्न काय पाहायचा--लग्न केव्हां होईल, येवढच ना?

**यमुनाः—**इश्य--तेवढाच नाहीं कांहीं--आपलं एकंदर सगळं पाह्यचं--पण काय, हो--त्या नर्मदाबाईनीं म्हणे तुम्हाला चिठ्ठी लिहिली होती कसली, आणि त्या काय म्हणे तुम्हाला—लग्न करा म्हणून म्हणतात त्यांच्याशीं--खरं का हें ?

**दिलरुबाः—**अहो तसं पुष्कळ असेल, पण मी कबूल केलं पाहिजे ना ? उद्यां कदाचित् तुम्हीसुद्धां म्हणाल असं—पण मी कबूल केलं पाहिजे ना ! काय—

**यमुनाः—**इश्य, मी कशाला म्हणतें आहे. आमचे दादा असतांना--

**दिलरुबाः—**बरं समजा--माझे वडील इथ नाहींत, मी म्हणतों तुम्हाला, करताय का माझ्याशीं लग्न--

**यमुनाः—**इश्य, मला म्हणणार वाटतं—तुम्हाला तसंच म्हणायचं असेल तर आमच्या दादांजवळ म्हणा--माझ्याजवळ म्हणून काय उपयोग—

**दिलरुबाः—**पण दादा तुम्हाला विचारतीलच कीं नाहीं—

**यमुनाः—**इश्य, दादा माझ्या लग्नाबद्दल आणि मला विचारणार ! कांहीं तरी बाई भलतंच बोलताय तुम्ही ! नवरामुलगा पाह्यचा म्हणजे एक ठराविक पद्धत आहे, जास्तींतजास्त पैसा जवळ असलेला, पुष्कळ शिकलेला--मग तो क्षयी असला तरी चालेल ! परवां बाई माझ्या एका मैत्रिणीचं लग्न ठरलं--नवरामुलगा होता आपला क्षयीच—पण मुलीच्या वडिलांनीं पाहिलं--मुलगा क्षयी असला तरी त्याचा विमा उतरलेला होता दहा हजारांचा--अन् केलान् काय त्यालाच पसंत ! झालं तिच्या लग्नाला परवांच वर्ष--आतां तिचे वडील ज्याला त्याला प्रौढीनं सांगतात—पहा, वर्ष झालं पोरीच्या

लग्नाला—अजून नवरा आहे! आमचे दादा कांहीं अगदींच तशा-पैकीं नाहींत म्हणा—

**दिलरुबाः**—मग मी त्यांना पसंत पडेन का नाहीं !

**यमुनाः**—पडाल बहुतकरून !

**दिलरुबाः**—( स्वगत ) पण त्या नर्मदेचं लग्न ठरल्याशिवाय-आपण कांहीं आपलें लग्न ठरविणार नाहीं ! (उघड) बरं, जा आतां तुम्ही—मी पाहून ठेवतों तुमची पत्रिका. उद्या सांगेन तुम्हांला सगळं—नाहीं तर येईल आतां कुणी तरी—

**यमुनाः**—बरं, पण खरं खरं सांगा हं—( जाऊं लागते. )

**दिलरुबाः**—आतां हिनं जर मागं वळून पाहिलंन् तर हिचं माझ्यावर प्रेम आहे—नाहीं तर—अरेच्या ! ही गेली तशीच—प्रेम नाहीं ! छेः असं कुठं झालंय—ती पहा आलीच परतून—

**यमुनाः**—हें काय, घरांत कुणीच नाहीं वाटतं ?

**दिलरुबाः**—नाहीं, बाहेर गेलीं आहेत वाटतं सगळीं ! आणि दादा कुठें आहेत तुमचे ?

**यमुनाः**—ते शाळीग्रामपंत आहेत ना, त्यांच्याशीं बोलत उभे आहेत बाहेर.

**दिलरुबाः**—काय,तुमचं लग्न ठरवीत आहेत काय त्यांच्याशी ?

**यमुनाः**—इश्य, मला काय माहीत ?

( नर्मदा प्रवेश करते. )

**नर्मदाः**—काय यमुनाताई—घरांत नाहीं वाटतं कुणी—आणि कसली वाटाघाट चालली आहे तुमच्या दोघांचीच ?

**दिलरुबाः**—नाहीं, तसं कांहीं नाहीं ! दादायांचं लग्न ठरवीत आहेत वाटतं शाळिग्रामपंतांशीं !

**नर्मदाः**—कुणाशीं ?

**दिलरुबाः**—आपले ते तुमचे शाळिग्रामपंत.

**नर्मदाः**—त्यांच्याशीं ?

**दिलरुबाः**—अरे वा, अगदीं त्यांचं नांव घ्यायचंसुद्धां टाकलंत वाटतं एव्हांपासून !

**नर्मदाः**—तुम्हाला काय करायच्या आहेत चांभारचवकशा ?

**दिलरुबाः**—फारच फटकळपणानं बोलतां बुवा तुम्ही !

**नर्मदाः**—तुमची वागणूकच धड पडली !

**दिलरुबाः**—(स्वगत) या बायका म्हणजे फार कावेबाज—प्रेम असून कधीं दाखवायच्या नाहींत ! आतां एक धाडसी गंमत करून पहातों ! ( खिशांतून चाकू काढून पेन्सिल करण्याचा आव आणतो व चाकूनें मुद्दाम आपलें बोट कापतो. त्यांतून रक्त वाहूं लागतें.) (उघड) अयाई ग ! यमुनाताई, फडक्याची चिंधी आणा हो एखादी—

**यमुनाः**—थांबा ह, घरांतनं आणतें मी एखादी ! (जाते.)

**दिलरुबाः**—( खिशांतून हातरुमाल काढून ) नर्मदाताई, माफ करा. त्रास देतों आपल्याला, बांधतां का येवढं फडकं माझ्या बोटाला—

**नर्मदाः**—हं, आणा इकडे ! ( नर्मदा बोट बांधूं लागते; इतक्यांत शाळिग्राम येतो.)

**शाळिग्रामः**—(स्वगत) काय चाललं आहे या दोघांचं इथं ? संशय, संशय ! या संशयानं डोकं खाल्लं माझं ! काय मनःप्रवृत्ति आहे माझी ! मन पापाच्या विचारानंच कां चालतं ? संशयानंच डोक्याचा ताबा कां घ्यावा ? आणि ती चांडाळीण—ती पहा—ती पहा हंसत खिदळत त्याच्या बोटाशीं खेळते आहे ! एकदम मोठ्यांदा ओरडून सांगूं का ही माझी लग्नाची बायको आहे म्हणून ! ठीक आहे !

आतांच उतावीळपणा नको—या प्राण्यालाच गांठतों एकीकडे आणि घेतों त्याचा खरपूस समाचार ! म्हणजे जन्माची याद राहील त्याला ! आतां मात्र माझी ठाम समजूत पटली कीं चाकू, सुरी, कात्री हीं जशीं लहान मुलांचीं खेळणीं नव्हत; त्याप्रमाणं बायकांबद्दल विनोद हीं आम्हां संकुचित दृष्टीच्या जनावरांचीं कामं नव्हत ! खेळ म्हणून खेळायला गेलों तों खेळखंडोबा झाला आणि संतापाच्या भरांत स्वतःच्याच 'श्रीमुखांत' मारून घ्यायची वेळ आली !

[ राग—सारंग, ताल—त्रिताल ]

**मनीं या येई कुशंका। सकल स्वर्गसुख जाई लयाला।**
**रमणि खास, करी विनाश, अवचित का? ॥ ध्रु० ॥**
**संशय मानस करित बधिर मम । कान्ता पतिता मम भार्येसम। करुनि कृति, खचित पति ने नरका ॥ १ ॥**

**अंक दुसरा समाप्त**

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

( स्थळ—वसंताचा दिवाणखाना. )

**वसंतः**—तो एक फार्स मध्ये विनाकारणच झाला. ते दादा आणि त्यांची मुलगी यमुना—गेली बिचारीं दोघंहीं आजच्या गाडीनं ! यमुनाहि होती चुणचुणीत--असं असून काय त्या म्हाताऱ्याला त्रास विनाकारण ! सहज मजा म्हणून शाळिग्रामाला माझा मेव्हणा म्हणून पुढं केला, तो विनोद निर्दयपणाचा झाला ! याबद्दल मला पश्चात्ताप वाटतो आहे ! असो, गेलीं बिचारीं आज दोघंहि ! केवळ विनोदाकरितां त्या दादांची मी थट्टा करावी याबद्दल शरम वाटायला पाहिजे मला-पण झालं खरं—( दादा प्रवेश करतात.) कोण, दादा—कां हो ?

**दादा०ः**—काय करावं हो, दोन मिनिटांच्या फरकानं गाडी चुकली ! आतां आला पुन्हां तुम्हांला त्रास विनाकारण—

**वसंतः**—छे हो ! त्रास कसला त्यांत—

**दादा०ः**--हो त्रास नव्हेच, विसरलोंच होतों मी—आपली करमणूक करायला एक जागा झाली तुम्हांला—पण वसंतराव-- आपणहि म्हातारे व्हाल, आपल्यालाही मुलीबाळी होतील--आणि मग त्यांच्या लग्नाच्या वेळीं जेव्हां तुमच्या डोळ्यांतून टिपं बाहेर पडतील—त्या वेळेला मग आठवण करा हे या आत्तांच्या प्रसंगाची--

**वसंतः**—दादा, असं काय बोलतां तुम्ही--

**दादा०:**—अहो, मला बोलतांना विनोद साधतच नाहीं मुळीं! विनोदाची पिढी म्हणजे तरुण पिढी—आणि म्हातारीं माणसं या त्यांच्या विनोदाच्या जागा!

**वसंत:**—दादा, खरोखरच माफ करा हं! केवळ आमच्या घरांत आम्हाला फार दिवसांनीं भेटलेले दोन समवयस्क पाहुणे आपण यायच्या अगोदरच आलेले होते—आणि सहज त्यांच्याशीं हंसतखिदळत असतां—त्याच उन्मादांत असतां—आपण आलांत —तरीही होऊं नये; पण चूक झाली माझ्या हातून—दादा, आपली थट्टा केली—मोठेपणानं आपण मला क्षमा नाहीं का करणार?

[ राग—शंकरा, ताल—त्रिताल ]

**अनुराग वरा, नच रोष धरा।**
**धरुनि लोभ अवमाना विसरा॥ धृ०॥**
**करि लीला अरि बाल माय दे।**
**नच कोपा कधीं हृदयीं आसरा॥ १॥**
**अनुताप करी दाह मानसीं।**
**झणिं स्नेहजलें शान्त त्या करा॥ २॥**

**दादा०:**—झालं, लागलास लाघवी बोलायला! तुम्हा पोरांना या दोन विद्या फार छान साधल्या आहेत हल्लीं! एक आचरटपणाचा विनोद तरी करायचा, नाहीं तर मुळुमुळू रडल्यासारखं करुण रसांत तरी बोलायचं! ऐकलं, संपला माझा राग! तुम्हांला—तुला जाणीव झाली, समाधान वाटलं आपल्याला! हें बघ, मी उद्यां पहांटेच्या गाडीनं जाणार होतों—पण आतां हें घर मला आपलंसं वाटायला लागलं—एक दिवस जास्त

मुक्काम आपला आतां--नाहीं तर म्हणशील भटाला दिली ओसरी आणि भट हातपाय पसरी--

**वसंतः**--नाहीं दादा, आणखी एक दिवसच काय--एक महिनाभर रहा आपण इथं--आपली मुलगी यमुना माझी पाठची बहीण समजून तिचं लग्न मी इथेंच जमवतों कुठें तरी--लग्न इथेंच करूं आपण--आणि मगच जा मुळीं तुम्ही !

**दादा०ः**--छेः छेः ! आतां मात्र भलतीच सुरुवात केलीस हो-

**वसंतः**--भलतं काय झालं दादा त्यांत ? तें कांहीं नाहीं-- यमुताईचं सासरमाहेर इथं पुण्यांतच आतां--लग्न होईपर्यंत आमच्याइथ माहेरीं म्हणून राहील आणि लग्न झाल्यावर सासरी ! ठरलाच बेत मुळीं !

**दादा०ः**--फारच लाघवी बुवा तूं ! पण काय रे--अरे जारे म्हटल्याचा राग येत नाहीं ना ? आमचं असं होतं बघ ! एकदां अंतःकरण दिलं कीं आपपर भाव नाहीं--

**वसंतः**--नाहीं, नाहीं ! दादा आपण मला खुशाल अरे जारेच हांक मारा--खरं सांगूं तुम्हाला--आज फारा दिवसांनीं वात्सल्यपूर्ण एकेरी हांक ऐकायला मिळाली मला ! बरं, यमुना-ताई कुठ खालींच आहेत वाटतं ? (यमुना चहाचा कप घेऊन वर येते.) काय यमुनाताई, आज आपणशा चहा घेऊन आलांत ?

**यमुनाः**--इश्य, काय आलं मी आलें म्हणून ? खालीं त्या दोघी बसल्या आहेत बोलत--वासंतीताई मला म्हणाल्या जातेस का चहा घेऊन--म्हणून आलें मी--का देऊं त्यांनाच पाठवून ?

**वसंतः**--नाहीं, तुम्ही आणलात यांत बिघडलं नाहीं कांहीं !

आणि बरं का, आतां सांगून ठेवतों—अगदीं घरच्यासारखं वागायचं आतां इथं—आतां परकेपणा नाहीं धरायचा !

**यमुनाः**—छेः ! परकेपणा काय म्हणून—

**वसंतः**—यमुनाताई, खालीं माहीत नाहीं वाटतं दादा वर आल्याचं—आणखी एक कप चहा या ना घेऊन—आणि आपला झालाच असेल चहा घेऊन—काय ?

**दादा०ः**—मग काय—वसंतराव, पहाणार का कांहीं आमच्या यमूच्या लग्नाबद्दल ?

**यमुनाः**—दादांचं किनई आपला नेहमीं तोच तोच विषय ! अन् त्यांतनं मी समोर आलें अन् दुसरा विषय जरी चालू असला तरी कथेकऱ्यासारखं आपली सर्व कथा पुन्हां मूळपदावर—

**दादा०ः**—वसंतराव, आपल्या घराचा गूण लागला आमच्या यमूला ! तीसुद्धां लागली बोलण्यांत कोट्या करायला ! काय वसंतराव, मग मी मगाशीं म्हणालों त्याचं काय ?

**यमुनाः**—इश्य ! आलें हं मी आणखी एक कप चहा घेऊन.

**वसंतः**—या हं. ( यमुना जाते. ) दादा, घ्या चहा—नाहीं तर निवेल विनाकारण.

**दादा०ः**—घ्या-आपणच घ्या—

**वसंतः**—मी घेतों हो येईल तो—आपण तर घ्या पहिल्यांदा—

**दादा०ः**—बरं ! आपला स्वभाव बुवा कांहीं भिडस्त नाहीं. ( चहा घेत घेत ) हं, मग काय वसंतराव—काय करताय आमच्या यमूच्या लग्नाचं ?

**वसंतः**—खरं सांगूं, मला आपला आतां राग आलेला आहे ! मगाचे दादा कांहीं आतां तुम्ही राहिलेले नाहींत ! मगाचे दादा

वात्सल्यरसाचे पुतळे होते, आतांचे दादा व्यवहारचतुर स्वार्थी बनले—जेव्हां आपल्या मुलीच्या लग्नाचा विषय नव्हता तेव्हां अरे जा रे आणि स्वतःच्या स्वार्थाचा संबंध आल्याबरोबर वसंतराव हं !—

( यमुना चहाचा कप घेऊन येते. वसंत चहा घेऊं लागतो. )

**दादा०ः**—बरं बुवा ! आम्हालाही स्वार्थी ठरवलंत--बरं आतां वसंत म्हणतो--काय रे वसंत, ( टेबलावर चाळून पहात ) चित्रमयजगतचा ताजा अंक वाटतं ?

**वसंतः**--हो. आजच सकाळीं आला--

**दादा०ः**—अस्सं का ! ( वसंत चहा घेत असतो. दादा चित्रमयजगत्चा अंक चाळतात. त्यांत त्यांना एक प्रेमचिठ्ठी सांपडते. ) ( स्वगत ) हें काय, हीच ती चिठ्ठी ! परवां मी शाळिग्रामपंतांना दिली आणि आज इथं कशी पुन्हां ? चला, राहूं द्या सध्यां आपल्या खिशांत ! ते शाळिग्रामपंत भेटले तर त्यांच्याजवळ या चिठ्ठीचा उलगडा करून घेऊं--बाकी उलगडा तो काय व्हायचाय म्हणा ! नर्मदा आणि दिलरुबा म्हणजे आतेमामेभावंडं. लिहिली असेल सहज थट्टेनं चिठ्ठी ! ( चिठ्ठी खिशांत घालतो. ) बरं वसंतराव, नव्हे वसंता—मी जरा बाहेरून येतों हं.

**वसंतः**--चला, मीही बाहेरच निघालों आहें--यमुनाताई, तेवढया कपबशा खालीं नेऊन ठेवायच्या हं !

**यमुनाः**—इश्य ! सांगायलाच पाहिजे होतं वाटतं अगदीं !

**वसंतः**--बरं बुवा, चुकलों. दादा चला--

**दादा०ः**--आमची यमुनाही लागली हं ठसक्यांत बोलायला--चला. ( जातात. )

**यमुनाः**—काय करावं बाई आतां! कांहीं म्हटल्या कांहीं सुचत नाहीं! आणि त्याच्यांतून अशी एकटी असलें कीं अगदीं भांबावल्यासारखं होतं मला! घटकेंत मनाला खिन्न वाटतं आणि घटकेंत खुदकन् हंसायलाही येतं! काय करावं बाई माणसानं अशा वेळेला. बाकी इथें आल्यापासून एकटं काय आणि दुकटं काय ——सारखंच. नुसतीं आपलीं ओळखीचीं माणसं येवढंच——पण—— मायेचा जिव्हाळा आहे का कांहीं त्यांत? बाकी, कां कुणाला ठाऊक मला आतांशा वासंतीच्या भावाशींच माझं लग्न व्हावं असं वाटूं लागलं आहे! पण बाई बोलून कसं दाखवायचं हें आपलं आपणच? म्हणतील काय दादा——पण मी बाई या ना त्या तऱ्हेनं दादांजवळ हें बोलून दाखविणार! मग दादा देवोत माझं त्यांच्याशीं लग्न करून नाहीं तर एखाद्या खुसळ खांब्याशीं लग्न लावोत——करायचं काय आपण तिथं? पण ते म्हणत होते कीं त्यांची आणि माझी पत्रिका अगदीं छत्तीस गुण जमून पटते आहे! पण हें आमच्या दादांना पटलं पाहिजे ना? ( बोलतां बोलतां टेबल चाळते व टेबलाचा ड्रॉवर उघडते. तिला लेटरकेसमध्यें चारपांच प्रेमचिठ्ठ्या सांपडतात. ती सहज म्हणून वाचून पाहते. सर्व चिठ्ठ्यांवरील मजकूर एकच असतो.) आंऽ! हं काय किस्सा गिरवल्यासारखं! एकच मजकूर सगळ्या चिठ्ठ्यांवर? या चिठ्ठ्या ठेवाव्यात आपण उचलून. यांत कांहीं तरी रहस्य आहे खास——

( दिलरुबा प्रवेश करतो. )

**दिलरुबाः**——कसं काय, ठीक आहे——

**यमुनाः**—मग माझं कुठं काय बिनसलं होतं?

**दिलरुबाः**—छेः ! तुमचंआमचं बिनसायचं नाहींच मुळीं ! कारण पत्रिकेंत अगदीं छत्तीस गुण जमत आहेत !

**यमुनाः**—इश्य— ( जाऊं लागते. )

**दिलरुबाः**—परमेश्वरा, 'इश्य' या शब्दांत तूं एवढी काय जादू भरून ठेवली आहेस हें तुझं तुलाच माहीत ! नाहीं, पण यमुनाताई—'इश्य' या शब्दाचा अन्वय-अर्थ—कांहीं माहीत आहे का आपल्याला ?

**यमुनाः**—आम्ही कांहीं येवढया शिकलेल्या मुली नाहींत— आम्हाला नाहीं कांहीं शब्दांचे अर्थ वगैरे कळत ! ( दिलरुबा यमुनेकडे पहात उभा रहातो ) अगदींच बाई हे आहांत तुम्ही ! इश्य ! ( जाते. )

**दिलरुबाः**—पूर्णविराम ! जसं 'व्हॉट म्हणजे काय' तसं इश्य म्हणजे इश्य ! पण अजून निश्चय होत नाहीं नर्मदा का यमुना तें ! ज्योतिष्यांनीं तर खात्रीनं सांगितलं आहे कीं माझं लग्न मार्गशीर्षांत म्हणून ! मार्गशीर्षांत येवढी खात्री—पण तो लग्न होणारा मार्गशीर्ष ह्या वर्षाचा का इथून पुढच्या पन्नासाव्या वर्षाचा, येवढंच काय तें अनिश्चित ! नर्मदेबद्दल मात्र अलिकडे मला प्रेमयुक्त भीति वाटायला लागली आहे. कारण परवां तिच्या प्रेमापायीं श्रीमुखांत खायची पाळी आली होती. तेव्हां पाह्यचं आम्ही श्रीमुखांत खाल्ल्याशिवाय जर आईबापांना सुनमुख पाह्यला मिळणार असेल तर नर्मदा, नाहीं तर यमुना ! पण कोणी तरी एक आणि मार्गशीर्ष ! तेव्हां गंमतच करून पाहूं आपण—चिठ्ठया टाकून पाहूं नर्मदा का यमुना तें ! ( कागद पहायला लागतो. ) आं, इथल्या प्रेमचिठ्ठया काय झाल्या सगळ्या!— लांबवल्या वाटतं कुणी तरी ! हरकत नाहीं. नर्मदेच्या आणि

माझ्या नसलेल्या प्रेमाची तेवढीच जास्त प्रसिद्धी होईल. आणि 'लांडगा आला रे आला,' अशी खोटी ओरड करतां करता जसा--गोष्टींत—एक दिवस खरोखरच लांडगा आला, तसं— काय नेम सांगावा—नर्मदेचं माझ्यावर चुकून बसेलहि प्रेम कदाचित् ! ( एका चिठ्ठीवर यमुना व एकावर नर्मदा असं लिहितो व चुरगाळून खालीं टाकतो व डोळे मिटून चिठ्ठी उचलूं लागतो. ) हं, आतां पाहूं दैवाचा कौल काय येतो तो--नर्मदा का यमुना--

( शाळिग्राम येतो व दिलरुब्याच्या पाठीमागें उभा राहून )

**शाळिग्रामः**—हं ! चालूं दे पुढं, नर्मदा-यमुना-तापी—साबरमती--बारामती,

**दिलरुबाः**—आं, काय हो राजश्री, आतां का तुम्ही इथ--मी तुमच्या वाटेला गेलों आहे कां ?

**शाळिग्रामः**—मग मी तरी काय वाटेला गेलों आहें तुमच्या ? तुम्हाला नांवं सुचवलीं आणखीं ! मग काय, पहा कीं चिठ्ठ्या उचलून ! पाहूं या ! देव देईल तो निकाल आपण मान्य करूं—हं चल, उचल चिठ्ठी--

**दिलरुबाः**—बघा हं पण, विरुद्ध निकाल लागला तरी 'श्रीमुखांत'ची भाषा नाहीं बोलायची !

**शाळिग्रामः**—कबूल.

**दिलरुबाः**—पण चिठ्ठी कोण उचलणार ?

**शाळिग्रामः**—आपणच उचला, मी दैववादी नाहीं !

**दिलरुबाः**—बरं मी उचलतों. ( चिठ्ठी उचलतो 'नर्मदा म्हणून चिठ्ठी निघते. ) दोस्त, नर्मदा, निकाल कबूल ! पण छट्—आतां इथं नाहीं उभं राह्यचं ! कारण तुम्ही आहांत दंडुकेबहादूर आणि आम्ही आहोंत प्रेमाचे शिपाई ! बराय. जातों—पण साहेब.



**शाळिग्राम**:——यमुना, तापी, साबरमती, बारामती——

( पृष्ठ ९६. )

आतां नर्मदा माझी हं! हं—असे खिन्न नका होऊं बुआ! अहो कांहीं नाहीं—हा सगळा नशिबाचा खेळ असतो!

**शाळिग्रामः**—आहांत खरे बुवा नशिबवान! आपण पाहिलं एकंदर ताळतंत्र—आपलं कांहीं जमत नाहीं या प्रेमाच्या बाबतींत! तेव्हां आपण तो नादच सोडून दिला—पण पहा भाउसाहेब, त्या नर्मदेच्या प्रेमाबद्दल—खात्री आहे ना आपली—कारण तिनं मला असंच फसवलं आहे! म्हणून म्हणतों जरा जपून असा! ( स्वगत ) या सोद्याच्या अंतःकरणाचा ठाव घेतला पाहिजे!

**दिलरुबाः**—अहो खात्री, अगदीं सोळा आणे! मगाशीं आपण नाहीं पाहिलंत, मी आपल्यादेखत तिला तिच्या चिठ्ठीचं उत्तर लेखी दिलं तें—तिनं मला चिठ्ठी लिहिली होती—पण तें नाही, प्रेमाचा विषय आहे तो आमचा खासगी—'दिव्य' प्रेमाच्या जाती!"

**शाळिग्रामः**—( स्वगत ) पण या प्राण्याची जात कोण बुवा? (उघड) बरं बुवा, नका सांगूं आम्हाला तुमच्या खासगी गोष्टी— ( उठून उभा रहातो. )

**दिलरुबाः**—बरं, निराश होऊं नका बुवा असे! या बसा असे, तुम्हाला मजा दाखवतों! प्रेमाचं नंदनवन आहे हें! ( निरनिराळ्या मजकुराच्या खोट्याच प्रेमचिठ्ठ्या नर्मदेच्या सहीनं लिहून काढलेल्या—एका पुस्तकांत चिकटवून ठेवलेल्या असतात तें पुस्तक शाळिग्रामला दाखवतो. शाळिग्राम एक एक चिठी वाचतो व चिडतो. ) काय, पटली खात्री—इतकीं पत्रं तिच्या हातचीं आहेत! पहा, सुरुवातीपासून संबोधनंसुद्धां कशीं 'डेव्हलप' होत गेलीं आहेत तीं! प्रिय, प्रिया, प्राणेश्वरा,

हृदयवल्लभा, ममजीवना---का हो ! तुमचा जीव कां असा तिळतिळ तुटतोय एक एक संबोधन ऐकून ! आणखी एक गंमत सांगू तुम्हाला ? बोलायचं नाहीं हं कुणाजवळ---नुसतं प्रेमचिह्नथांवरच नाहीं थांबलं आमचं हें गाडं--तिचा एक गोडगोडसा--गडे साखरेचा--' पुन्हां मरावें---पुन्हां जगावें परि पहिलें चुंबन घ्यावें !' नव्हे घेतलें---आहांत कुठं तुम्ही ?

**शाळिग्रामः**---अस्सं काय ! हें घे तर मग दुसरं चुंबन ( खाड्कन् त्याच्या श्रीमुखांत भडकावतो. दिलरुबा ताड्कन् उडी मारून पळतो.)

**दिलरुबाः**---अहो, काय मांग आहांत का राक्षस आहांत ?

**शाळिग्रामः**--कां--येवढयानं नाहीं का समजलं--थांब तर मग तुझीं हाडंच मऊ करतों--ही घे दुसरी श्रीमुखांत--( दिलरुबा पळून जातो. )

**शाळिग्रामः**--काय पागल आहे ! माझ्या संशयाचं निराकरण होसतर जरा गोडीनं वागून पहाणार होतों--पण अखेर माझं मन मला आवरतां आलं नाहीं ! आणि आतां तर यादवमामा आले आहेत ! तें शेंडेनक्षत्र आणखी काय तारे तोडतें आहे हरि जाणे ! ह्या चावटपणापासून माझं कांहीं अडलं होतं ? मी आपल्या कल्पनेचे मोकळे सोडलेले सिंह, व्याघ्र--माझे मलाच आवरेनासे झाले आहेत ! का अचानक खेळ बंद करूं हा सगळा ?

---

## प्रवेश दुसरा

( स्थळ--रस्ता. पात्रें--दादा व यमुना. )

**दादा०ः**---हं, काय यमुनाताई, तुमच्या लग्नाकरितां आलों

आणि भलत्याच भानगडींत वेळ चालला आहे आपला. चला, निघूं या आपण एकदोन दिवसांत परत !

**यमुनाः**—इश्श ! तें काय म्हणून ?

**दादा०ः**—मग इथं राहून काय करायचं आतां ?

**यमुनाः**—इथंच जमवा बाई माझं लग्न !

**दादा०ः**—म्हणजे ? म्हणतेस तरी काय, यमुने ! इथंच कुणाबरोबर जमवूं तुझं लग्न ?

**यमुनाः**—इश्श ! मी नाहीं बाई सांगत ?

**दादा०ः**—अग अर्धवट काय बोलते आहेस अशी.

**यमुनाः**—मग आणखी काय बोलूं बाई मी. मी नाहीं बाई आणखी कांहीं जास्त सांगत.

**दादा०ः**—सांगितलं आहेस कुठं काय, तर आणखी सांगायचं नाहीं म्हणतेस ! सांग, सांग पोरी, मी कांहीं अगदींच अडमुठा म्हातारा नाहीं. तुझ्या मनासारखं करणं शक्य असेल तर तुझं मन मोडणार नाहीं मी.

**यमुनाः**—दादा, दादा ! तुम्ही किती हो चांगले आहांत ! नाहीं तर परवां नाहीं का बाई आपल्या शेजारचे ते मराठे—त्यांनीं बाई आपण होऊन आपल्या पोरीचं—येसू वाटतं नांव तिचं—लग्न ठरविलं काय, तिथि-निश्चय झाला काय, नवऱ्यामुलानं मुलीला पाहिली काय—एकमेकांना वाटलं आतां आपण नवराबायको होणार म्हणून—अन् कुठं बाई माशी शिंकली कोण जाणे ! लग्नाच्या आधल्याच दिवशीं तिच्या वडिलांनीं केलं बाई कांहीं बायकांचं कारण पुढं आणि पहिल्यांदा लग्न लांबविलं—

**दादा०ः**—हो हो, ते मराठे ना—ते आहेत जरा फाजील शहाणेच ! तें लग्न कां मोडलं मला माहीत आहे. तिथिनिश्चय झाल्यानंतर

सहज सासरेजांवई भेटले रस्त्यांत. जांवई चालले होते सायकलवरून सायकलमध्यें नव्हता वारा--तर तो मराठे कसला दीर्घसूत्री. मनुष्य पारखण्याची फार घमेंड आहे त्याला--त्यांन कयास बांधला कीं सायकलमध्यें भरपूर वारा नसतां ज्या अर्थी जांवई सायकल दडपीत नेत आहेत त्या अर्थी आपला होऊं घातलेला जांवई दडप्या आहे म्हणून ! झालं, एवढाच संशय आणि म्हाता-ऱ्यानं लग्न मोडलं !

**यमुनाः**—छे बाई, तुम्हाला नाहीत आंतलीं खरी कारणं माहीत ! अहो, तो त्यांचा होऊं घातलेला जांवई आहे थोडासा फटकळ आणि सडेतोड बोलणारा ! तेव्हां त्याला मित्र म्हणविणारे पण शत्रू लेखणारे स्नेहीच फार. एका दिवाळखोरानं त्या मराठ्यांना दिला कांहीं कानमंत्र. सखारामपंत या नांवाचा एक म्हाताराही त्यांतच सामील. मराठे बिथरले आणि त्या दिवाळखोराच्याच घराण्यांत दिली मुलगी ! आणि दोघेही मेले मांग असे कीं त्या लग्नाची आमंत्रण-पत्रिका त्यांनीं पूर्वी ठरलेल्या जांवयाला पाठविली !

**दादा०ः**—अस्सं काय ! इतका हलकटपणा केला का त्यांनीं ! काय शिंचीं माणसं आहेत का पशू आहेत !

**यमुनाः**—आणि संभावितपणानं वर म्हणतात कसे 'अवश्य यायचं हं लग्नाला!' तो पूर्वीचा जांवई फटकळच. त्यानं हंसतहंसत उत्तर दिलें, 'हो हो, येणार म्हणजे? माझ्या बायकोचंच जर लग्न आहे तर मी न येऊन कसं चालेल?' अशीं चिडतात हो मग माणसं !

**दादा०ः**--हें बघ, तुला कांहीं सांगायला नको, मी कांहीं तितका नीच नाहीं. तेव्हां त्या मराठ्यांची भानगड अशी आहे म्हणतेस एकंदरींत. पण काय ग, त्या जांवयानं वाटतं 'माझ्या विम्याच्या

दहा हजारांच्या पॉलिसीज् आहेत' असं खोटंच सांगितलं होतं म्हणे ! हा हलकटपणा त्यांनीं तरी कां करावा ?

**यमुना०ः**—अहो कांहीं नाहीं; खोटं—खोटं सारं ! त्यांच्या खऱ्याच पॉलिसीज् होत्या, पण त्यांनीं कांहीं सांगितलं नव्हतें आहेत म्हणून. त्यांना कळलें बाहेरूनच—अन् हे चांभार त्यांना विचारायला आले आणि म्हणाले 'पॉलिसीज् आम्हाला दाखवा.' तों ते राजश्री काय फटकळ ! ते म्हणाले, आतां पॉलिसीज् पहायला मागितल्यात ! जरा वेळान माझ्या घरांतलीं भांडीं पहायला मागाल ! आणि जांवयाचं मरण गृहीत धरून विम्याच्या पॉलिसीज्च्या आधारावर लग्न ठरवूं पहाणाऱ्या बेरडाची मुलगी मला अजीबात नको ! मुलीची जात काय—हा नाहीं तो, जो घुसळखांब पुढं उभा कराल त्याच्याच गळ्यांत माळ घालायची !

**दादा०ः**—पण आतां आमची ही मुलगी कोणाच्या गळ्यांत माळ घालणार !

**यमुनाः**—मला नका बाई विचारूं !

**दादाः०**—अरे वा ! हें खूप आहे बुवा ! शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या गप्पा मारायला जीभ कशी चुरुचुरु चालली आणि आतां स्वतःबद्दल बोलतांना जिभेला कुलूप ! सांग ना आतां—मी कबूल करतों बाप कसाई असतात म्हणून—बोल, कुठं ठरवूं तुझं लग्न !

**यमुनाः**—इश्य ! तुमच्या लक्षांत आलं आहे आणि उगीचच माझ्या तोंडून काढूं पहातां होय ! मी नाहीं हं अशी फसायची !

**दादा०ः**—हो, पण पोरी, त्यांनीं कबूल केलं पाहिजे ना ! तेवढ्याकरितां तर मी इथं आलों. पण तो दिलरुबा म्हणतो, मला लग्नच करायचं नाहीं इतक्यांत !

**यमुनाः**—इश्य ! कांहीं तरीच ! माझ्याजवळ कबूल केलं आहे त्यांनीं ! अन् दादा, त्यांची आणि माझी पत्रिकाहि जुळते आहे चांगली ! त्यांनींच पाहिली माझी पत्रिका !

**दादा०ः**—हा कार्टे ! अन् एवढं सगळं केलंत केव्हां ? कमाल आहे बुवा ! अन् मलासुद्धां दाद लागूं दिली नाहींस ! हें मात्र चांगलं केलं नाहींस हं यमू ! असला फाजीलपणा मला नाही खपणार ! चल, मन विटविलंस माझं थोडक्यासाठीं. वेशरम कार्टी !

**यमुनाः**—हें हो काय दादा !

**दादा०ः**—हं चला—चला आतां ! वेशरम–उठवळ–निर्लज्ज—फाजील साऱ्या मुलुखाची ! (जातात.)

---

## प्रवेश तिसरा

( स्थळ—वसंतरावांचा दिवाणखाना. वासंती-वसंत बोलत बसलीं आहेत असा प्रवेश.)

**वसंतः**—काय ग वासंती, एक प्रश्न विचारायचा आहे तुला.

**वासंतीः**—मलासुद्धां आपल्याला एक गंमत सांगायची आहे,

**वसंतः**—अस्सं का—काय आहे बुवा तुझी गंमत ?

**वासंतीः**—गंमत म्हणजे अशी, मला बाई वाटलं नर्मदेचं शाळिग्रामावर प्रेम जडलं आहे म्हणून; अन् त्यांची चालचलणूकही तशीच दिसत होती—पण बाई ही पाहिलीत का एक गंमत—मला नाहीं बाई वाटलं इतक्या वांकड्या वळणानं या थरावर गोष्ट येईल असं ! ( दिलरुब्याजवळून मिळालेलें प्रेमचिठ्ठीचें पाकीट वसंताच्या हातांत देते. वसंत वाचून पहातो.)

**वसंतः**—वासंती, ही खोड चांगली नव्हे! आपण नवराबायको झालों म्हणून काय झालं--माझ्या खिशांतल्या कागदपत्रांना कां तूं हात लावलास—

**वासंतीः**—मी कशाला बाई तुमच्या खिशाला हात लावूं? उगाच आपलं बोलायचं कांहीं तरी!

**वसंतः**—मग ही चिठ्ठी कुठं सांपडली तुला?

**वासंतीः**—कुठं म्हणजे, असं सरळ विचारा की--अहो, परवां भाऊनं माझीं आलेलीं म्हणून दोन पत्रं दिलीन् माझ्या हातांत---त्यांत त्याच्या नजरचुकीनं ही चिठ्ठी आली त्यांत--

**वसंतः**—म्हणजे, मलाही असली एक चिठ्ठी सांपडली आहे! परवां भाऊसाहेबांनीं परटीकरितां म्हणून कोट बदलला त्या वेळीं --सहज त्यांच्या हलगर्जीपणामुळं ती चिठ्ठी त्यांच्या हातांतून खालीं पडली--हां बघ दाखवतों तुला! बाकी ती चिठ्ठी वाचून— मात्र कुसुमायुध कुठं आणि कसं शरसंधान करील—याचा नेम सांगतां येणार नाहीं एवढी माझी खात्री झाली! वास्तविक नर्मदा आणि शालिग्राम हीच जोडी शोभून दिसेल; पण नर्मदेचं लक्ष दिलरुब्यावर! अगदीं मराठी म्हणींत सांगायचं म्हणजे राजाचं प्रेम राणीवर आणि राणीचं लक्ष मशालजीवर! ( खुंटीवरच्या कोटाच्या खिशांतून त्याजजवळची चिठ्ठी काढून आणतो व वासंतीनें दिलेली व आपल्याजवळची चिठी ताडून पहातो. ) आं! मजकूर एक अगदीं—लबाडी दिसते यांत कांहीं तरी!

**वासंतीः**—अग बाई! ही काय भानगड आणखी--

( दादा प्रवेश करतात. )

**दादा०ः**—हं, वसंता, कां आतां आहेना समाधान--अगदीं अरे जारे म्हणतो! हं, काय रे वसंता--एक गंमत विचारायची

आहे तुला--तुझ्या कानांवर कांहीं गोष्टी अजून नाहीं का आल्या ! अरे काय सांवळागोंधळ माजलाय तुझ्या घरांत हल्लीं--

**वसंतः**--कां, काय झालं--

**दादा०ः**--त्या शाळिग्रामपंतावरचा माझा आतां विश्वास उडाला आहे ! काय रे, या चिठ्ठीचा अर्थ काय ?--

( वसंत चिठ्ठी हातांत घेऊन वाचूं लागतो. वासंती त्याच्यामागें जाऊन दोघेंही एकदम चिठ्ठी वाचतात. दोघेही एकदम ) आं !

**वसंतः**--काय दादा, ही चिठ्ठी कुठं मिळाली तुम्हांला--

**दादा०ः**--कुठं आणि काय, मिळाली खरी--कर पाहूं आतां या गोष्टीचा उलगडा--मी शाळिग्रामपंतांना विचारलं आहे-त्यांनीं सांगितल मला ! पण तो गृहस्थ आहे थापेबाज म्हणून तुला विचारतों!

**वसंतः**--अहो, या गोष्टीचा मी काय उलगडा करणार--माझा मात्र जास्त जास्त घोंटाळा होत चालला आहे--बरं, या गोष्टीचा शाळिग्रामानं काय उलगडा केला--

**दादा०ः**--त्यांनीं मला सांगितलं कीं, नर्मदा आणि दिलरुबा हीं आतेमामेभावंडं आहेत--

**वासंतीः**--कोण, नर्मदा आणि माझा भाऊ दिलरुबा हीं आतेमामेभावंडं ?--कुणी बाई त्यांना सांगितलं हें नातं ?

**दादा०ः**--त्यांना कुणी सांगितलं तें एक परमेश्वर जाणे--पण मला त्यांनीं सांगितलं एवढं खरं--

**वसंतः**--काय हो, काय या चिठ्यांचा अथ ? एक-दोन-तीन अगदीं नमुना एक--

**वासंतीः**--मीही बुचकळ्यांत पडलें आहे ! काय--आहे तरी काय बाई हें ?

**वसंतः**--माझ्या हातांत पहिल्यांदा जेव्हां चिठ्ठी पडली



**वासंती:**—कुणी बाई त्यांना सांगितलं हें नातं ? (पृ. १०४)

तेव्हांच मला संशय आला होता–पण आतां या एकाच मजकुराच्या तीन चिठ्ठया पाहून तर माझी खात्रीच झाली––कीं हा कांहीं तरी आचरटपणा आहे! हा केलाय कुणी तें कांहीं सांगतां येत नाहीं!––

**दादा०ः**––मी तुला एक सांगू का, तुझ्या घरांत हल्लीं भुताटकी माजेलेली दिसतीय मला––आणि पहावं तो प्रत्येकजण प्रेमासाठीं विव्हळतोय! (यमुना येते.) हं. या यमुताई––तुम्हाला नाहीं ना अजून प्रेमाच वारं लागल कुठं––कारण आपण आहोंत प्रेमान पछाडलेल्या या भुताटकीच्या घरांत––ह, सांभाळून असा! (स्वगत) संभाळून काय असायच––आमच्या कार्टीनेही तशीच वेळ आणली आहे!

**यमुनाः**––मला बाई अजून प्रेम म्हणजे काय तेंच कळत नाहीं! पण ही पाहिलीत का गमत सांपडली आहे मला! (तिला सांपडलेल्या चारपांच प्रेमचिठ्ठया दाखविते. दादा पहातात व वसंताच्या हातांत देतात. तें व वासंती वाचतात.)

**दादा०ः**––ह! वसंता, या घे आणि पहिल्या चिठ्ठयाच्या आतेमामेबहिणी!––

**वसंत०ः**––आं! 'प्रेम प्रिंटिंग प्रेस' निघाला कीं काय आमच्या घरांत!

**वासंतीः**––आतां मात्र शर्थ झाली बाई––ह्या प्रेमाच्या पायीं मनुष्य काय करील याचा कांहीं नेम नाहीं.

[राग—बागेश्री, ताल—त्रिताल]

**भूप स्मर जणुं होत भूवरी। नाचवि जगता जैसी भिंगरी। गिरगिर फिरवी स्वैर धरि फेर॥ धृ०॥**
**जरि ललना बघतां भुले नर। मोहित परि ती होय कुजावर। लीला करि ही कुसुमचापधर॥ १॥**

**वासंतीः**—( स्वगत ) आमच्या भाऊचा तर आचरटपणा नव्हे हा! कोण मेला हा बाष्कळपणा—अजागळ कुठला! ही जर त्याचीच कांहीं कारवाई असेल तर मग मला खालीं पाह्यची वेळ आली ग बाई! आतां अगोदर भाऊला एकीकडे गांठला पाहिजे.

**यमुनाः**—काय हो वासंतीबाई—काय हो या चित्रयांचा अर्थ?

**वासंतीः**—सध्यां तर बाई मला अनर्थ दिसतो आहे सगळा!

**वसंतः**—आणि हा जर खरोखरच कांही आचरटपणा मुद्दाम कुणी केला असेल तर तो किळसवाणा आहे! असली घाण घरांत वाढूं देतां कामा नये—

**वासंतीः**—मी काय बोलूं बाई आतां?

( नर्मदा प्रवेश करिते.)

**नर्मदाः**—वासंती, जातें हो बाई मी—अशीच्या अशीच घरीं! सभ्य स्त्रियांनी रहाण्यासारखं हें घर आहे असं कांहीं बाई नाहीं वाटत मला—

**वासंतीः**—नर्मदे, झालं तरी काय बाई असं—

**नर्मदाः**—इकडे ये—तुला-एक प्रदर्शन दाखवतें—

**वासंतीः**—काय ग बाई—

**नर्मदाः**—ये इकडे—( दोघी कव्हरसीनजवळ येतात. शालिग्रामला दुसऱ्या अंकाच्या शेवटीं दिलरुब्यानें जी खोट्या प्रेमचित्रया लिहिलेली वही दाखविली होती ती वासंतीला दाखवीत ) मला असं सांग कीं हा पाचकळपणा कुणाचा? तुझ्या भावाच्या नांवानं लिहिलेल्या—माझ्या सहीच्या या इथं इतक्या प्रेमचित्रया एकाठिकाणीं चिकटवून त्याचा हा अल्बम तयार केला आहे—हें तुलासुद्धां मी एकीकडे सांगायला पाहिजे होतं—पण त्या गोष्टींची मला इतकी चीड आली आहे कीं—एका खोट्या अर्थानं यांत

जरी माझी बेअब्रू आहे तरी ती पत्करून—मला तुला असं स्पष्ट विचारायचं आहे--कीं इतकीं निखालस बेअब्रूचीं माणसं या सुशिक्षित समाजांत निर्माण होतात कशीं—आणि असली किळस-वाणी घाण करणारं माणूस तुझ्या घरांत कसं ?

**वासंतीः**—नर्मदे, हें बघ—तूं आतां खालीं जा. या गोष्टीचा पूर्ण उलगडा मी करतें काय तो--आणि हें बघ संतापूं नकोस—काय बरं सांगणार होतें बाई मी पुढं—छे. बाई, माझंही पण डोकं भ्रमल्यासारखं झालं आहे—चल बाई तूं खालीं—

( वासंती व नर्मदा जातात.)

**दादा०ः**—वसंतराव, तुम्ही एकदां असं करा—तुमच्या घरांत आहेत नाहीत तेवढी सगळीं माणसं एकदम एका ठिकाणीं बोलवा, आणि एकदां सर्व झाडझूड करून टाका—फार घाण माजलेली दिसते आहे विनाकारण तुमच्या घरांत हल्लीं !

**वसंतः**—वास्तविक सांचूं नये ! पण सांचलेली दिसते आहे खरींच—

**दादा०ः**—आणि मला वाटतं ही सर्व घाण 'विनोदी ' पणाच्या कल्पनेवर माजलेलं शेवाळं आहे ! कोणताही एकच रस शेवटीं असा निरस होतो--मी हल्लीं पाहून ठेवलंय 'विनोदी ऊर्फ हास्यरस ' हल्लीं फार लोकप्रिय होत चालला आहे—कुठंही पहा, विनोद पाहिजे ! या विनोदरसाच्या हव्यासानं नाटकी लोकांनीं मराठीला गळफांस लावून—उर्दू नाटकांची सवत घरांत घेतलीच आहे ! ही झाली नाटकांची गोष्ट, पण कित्येक लोकप्रिय राष्ट्रीय वक्तेसुद्धां--एखाद्या थोर महात्म्याच्या निधनानिमित्त भरलेल्या 'शोकप्रदर्शन ' सभेंत—हास्यकारक कोट्यांचा पैजण पायीं घातल्याशिवाय प्लॅटफॉर्मवर पायच टाकीत नाहींत !

**वसंतः**---वा दादा, तुम्ही तर अगदीं राष्ट्रीय आखाड्यांत उतरलांत--

**दादा०ः**---अरे आम्हा म्हाताऱ्यांना काय---कुठंही जायला बदी नसते. आतां आमच्या स्मशानीं गोंवऱ्या गेलेल्या--आम्ही अगदीं उघड बोलणार---कारण कुणाच्या रागालोभाची पर्वा आहे आम्हाला आतां--- ?

**वसंतः**---तेंही खरंच म्हणा---काय यमुताई, कसं काय---

**यमुनाः**---ठीक आहे---! काय बोलायला कांहीं विषय नव्हता म्हणून हें बोलणं काढलंत वाटतं--

**वसंतः**---हं, असं झालाय खरंच ! दिवाळीचे चार दिवस गमतीनं जावेत म्हणून प्रोग्राम योजला एक, आणि त्या प्रोग्रामचा धुमाकूळ माजला आहे भलताच ! काय. दादा डोकं फिरायची वेळ आली बुवा आपली---

**दादा०ः**---हं, तें बरोबर आहे--नवराबायको दोघंच राह्यची संवय तुम्हाला ! तें चार माणसं चार दिवस जास्त राहिलीं तर होतं डोकं फिरल्यासारखं ! असं करा वसंतराव, तुम्ही स्वस्थ बसा आतां ! हं यमू, चल--आपणच जाऊं फिरायला जरा ! ( स्वगत ) खूप पाहुणचार भोगतोंय सध्यां मी ! माझ्या वयाचा एक मनुष्य नाहीं इथं--आजुबाजूला हा असा सगळा पोरखेळ. चार दिवस कसे काढले मी इथं तें माझं मलाच माहीत !

**दादा०ः**---हं, चल यमू--

**वसंतः**---बरं दादा, मी पडतों जरा स्वस्थ !

**दादा०ः**---बरं, आम्ही जातों जरा बाहेर !

( दादा व यमुना जातात. )

**वसंतः**---दिवाळींत विनोदाच्या फुलबाजा उडवायचा बेत

ठरवला तो स्फोटक द्रव्यांचा स्फोट होऊन कानठळ्या बसाव्यात अशी स्थिती झाली आहे माझी !

[ राग--ललत, ताल—त्रिताल ]

**मन बहु चंचल होई। भयद कल्पना घेई ॥ धृ० ॥**
**स्नेहामृत वांछिता पुढति का। कलह हलाहल येई ॥१॥**
**मन मानसिंचे नयन हारि तें। चित्र भंगुनी जाई ॥२॥**

---

## प्रवेश चवथा

( स्थळ--ओटी. दिलरुबा गाल चोळीत चोळीत प्रवेश करतो.)

**दिलरुबाः**--अखेर फार दिवसांपासून बसूं बसूं म्हणत होती ती 'श्रीमुखांत' बसलीच अखेर शेवटीं आमच्या ! काय करूं हो, माझं शरीरबळ हें असं दुबळं पडलं म्हणून—नाहींतर असा फैलावर घेतला असता त्या शाळिग्राम दगडाला—पण आतां नुसती हात चोळीत बसण्याची पाळी आली आहे ! पण ताईनं आणि वसंतरावांनीं काल पासून माझ्याशीं भाषण कां बंद केलं बुवा ? असं काय मी त्यांचं घोडं मारलं आहे ? ही आलीच ताई--पण आली आहे म्हणजे काय अगदीं रागानं लाल होऊन आल्यासारखी दिसते आहे ! ( वासंती येते.) काय ताई, माझ्यावरसा राग धरला आहेस कालपासून ?

**वासंतीः**—भाऊ, मोकळ्या मनानं सांगशील का एका गोष्टीचं उत्तर ?

**दिलरुबाः**--( स्वगत ) हा काय प्रश्न ? आमच्या 'श्रीमुखांत' ची ताजी तार पोहोंचली कीं काय ताईला ? (उघड) हो, विचार कीं !

**वासंती:**--त्या दिवशीं तूं माझीं दोन पत्रं दिलींस मला--काय रे, त्या पत्रांची काय भानगड आहे ?

**दिलरुबा:**--ताई, असल्या आमच्या 'प्रायव्हेट' गोष्टींत तूं पडूं नयेस हेंच चांगलं नव्हे का ?

**वासंती:**--पण तीच प्रायव्हेट गोष्ट चव्हाट्यावर आली आहे आतां--

**दिलरुबा:**--मग केव्हां तरी यायचीच होती ती, आज आली--काय बिघडलं त्यांत ?

**वासंती:**--नाहीं, बिघडलं नाहीं त्यांत कांहीं ! पण काय रे, ती चिठ्ठी तुला कुठं मिळाली ?

**दिलरुबा:**--ताई, आतां तुला मी हें सांगायला हवं कां 'नदीचं मूळ आणि ऋषीचं कूळ' कुणी पाहूं नये ! तसं 'प्रेमाचं मूळ आणि प्रेमचिठ्ठीचं स्थळ' विचारूं नये कुणी कुणाला ! तें नेहमीं पडद्यांतच असायला पाहिजे !

**वासंती:**--पण काय रे, ती चिठ्ठी नर्मदेनंच लिहिली होतीन् का तुला ?

**दिलरुबा:**--आतां मला काय माहीत नर्मदेनं लिहिलीन का यमुनेनं लिहिली ती ! ती चिठ्ठी मला मिळाली येवढं खरं ! कां, संशय वाटतो तुला त्याबद्दल कांहीं ? काय, नर्मदेचं माझ्यावर प्रेम नाहीं ? ती बोलली वाटतं तुझ्याजवळ तसं कांहीं ? नसलं तर नसूं दे. आपल्याला नाहीं तिच्या प्रेमाची जरूर !

**वासंती:**--पण काय हो भाऊसाहेब, आपण तर नर्मदेच्या प्रेमाविषयीं इतकी बेफिकिरी दाखवितां आणि या तिच्या आपल्यावरील प्रेमाचं प्रदर्शन करणाऱ्या पांचपन्नास चिठ्ठया इथं आहेत--

तेव्हां तिच्या प्रेमाचं काय होईल याची काळजीच नाहीं वाटतं तुम्हाला ?

**दिलरुबाः**---( स्वगत ) अरे बाप रे, इथून पुढं आमच्या फजितीला सुरुवात होणार कीं काय ? मी पुराणांत वाचलं होतं कीं भीमानं जरासंधाचे दोन तुकडे केले तरी ते पुन्हां एकमेकाला येऊन चिकटत म्हणून---पण या सगळ्या प्रेमचिठ्ठ्या एका ठिकाणीं कशा गोळा झाल्या बुवा ! आतां काय करावं, बाजू अंगावर येते कीं काय ? ( उघड ) हें छान आहे बुवा ताई तुझं, कुठनं गोळा केल्यास या सर्व चिठ्ठ्या तूं ? पण ताई, तूं कशाला पडली आहेस या भानगडींत ?

**वासंतीः**---मी तुझ्यासारखी प्रेमळ नाहीं म्हणून ! नर्मदा माझ्याकडे माझी मैत्रिण म्हणून आलेली आहे---आणि तिच्या नांवाची बदनामी माझ्या भावाकडून व्हावी---यांत मला भूषण वाटायला पाहिजे, असं तुझं म्हणणं ?

**दिलरुबाः**---पण यांत तिची काय बदनामी झाली बुवा ! तिचं लग्न अजून व्हायचं आहे, आणि माझंहि लग्न अजून व्हायचं आहे---

**वासंतीः**---तशा गांवांत आणखी हजार मुली लग्नाच्या आहेत ! मग त्या प्रत्येकीच्या नांवानं---आपल्या हातानं कां नाहीं अशाच आचरटपणाच्या चिठ्ठ्या लिहून ठेविल्यास ?

**दिलरुबाः**---( स्वगत ) अरेच्या, ताई बरीच चिडली आहे मनांतल्यामनांत---आतां अगदीं सपशेल माफी मागून आपण मोकळं व्हावं---त्यांत कसली आली आहे लाज---चुकून प्रेम करण्याचा प्रयत्न केला---आतां पश्चात्ताप झाला---माफी मागून मोकळं व्हावं, झालं ! (उघड) ताई, तुला एक गंमत सांगूं का ?

**वासंती**:—पुरे झाल्या तुझ्या गंमती ! आचरट आहेस झालं--

**दिलरुबा**:—मग नव्यानं काय सांगितलंस यांत तूं ? पण आतां मात्र मी तुला खरंच एक गंमत सांगणार आहें--बरं का ताई—

**वासंती**:--मला नाहीं आतां वेळ तुझ्या अशा या आचरट-पणाच्या गंमती ऐकायला !

**दिलरुबा**:--ताई, चुकते आहेस ! चुकते आहेस ! त्रिवार सांगतों--चुकते आहेस ताई तूं ! आचरटपणाची नव्हे, आश्चर्य वाटण्यासारखी गंमत आहे !

**वासंती**:—ती काय ? ऐकूं दे एकदां--

**दिलरुबा**:—सांगूं--आश्चर्य वाटेल बघ तुला—मला तुझी माफी मागायची आहे.

**वासंती**:--कशाबद्दल ?--

**दिलरुबा**:—तेवढं मात्र बोलायचं नाहीं, तें अगदीं गुपचुप-- एक तुला माहीत कीं मला माहीत--काय ! ताईसाहेब—करा झालं आतां माफी मंजूर—

**वासंती**:—खरंच भाऊ, तूं भाबडा आहेस हें खरं. पण—

**दिलरुबा**:—ताई-अग आपल्या माणसांबद्दल अशाच कल्पना कराव्यात नेहमीं !

**वासंती**:—पण काय रे भाउ-खरंच का तुझं नर्मदेवर प्रेम-

**दिलरुबा**:—बोलूं नकोस—तो विषय बंद आतां !

**वासंती**:—पण काय रे, प्रेम बसायला कारण ?

**दिलरुबा**:—तें कांहीं विचारूं नकोस, ताई ! प्रेमाचा सबदा फार सवंग झालाय हल्लीं ! अग, नाटकांत 'प्रेम' बसायला एक-

मेकांचं दर्शन तरी व्हावं लागतं, पण सत्यसृष्टींत पुष्कळ वेळेला असे चमत्कार पाह्यला सांपडतात कीं दर्शन नाहीं–फक्त पाठमोरी जातांना पाहिली–तों पाठीवर वाऱ्यानं फडफडणाऱ्या रंगीत रेशमी पदरावर मन भुलून–एकदम त्या बाईवर प्रेम! आणि प्रेम बसण्याची अशीच जर प्रगति चालू राहिली तर कापडवाल्यांनीं आपल्या लुगड्याच्या कपाटापासून जरा दूरच बसावं. नाहीं तर एखादा महा-भाग—तेवढया सान्निध्यावर सुद्धां कापडवाल्यावरच प्रेम करायला लागायचा! बरं ताई, जाऊं मी जरा बाहेर––झाली ना माफी मंजूर, गेलं मनांतलं किल्मिष—

**वासंती**:—भाऊ—काय हा पाचकळपणा—वरवर हंसा-यला येतं अशा गोष्टींकडे पाहून, पण मनापासून मात्र चीड येते या गोष्टींची! हं भाउराव—जा––जा—आतां—

( दादा प्रवेश करतात.)

**दादा०**:—काय वासंती, आज भावावरशी चिडली आहेस!

**वासंती**:—कांहीं नाहीं—सहज राग आला त्याच्या एका गोष्टीचा—

**दादा०**:––काय लग्नाला कबूल होत नाहीं म्हणून कीं काय, काय भाऊसाहेब लग्न करायचा विचार नाहीं वाटतं अजून आपला —मी तर बुवा आपल्याकरितां म्हणून इतक्या लांब आलों आहे बघा बुवा, निराश करूं नका आपल्याला!

**वासंती**:—( स्वगत ) असे हे मुलीचे बाप! एखादा मुलगा लग्नाचा आहे––आणि मुलगा सुस्थितींतला असला कीं त्यांना त्यांत कांहीं वैगुण्यच दिसत नाही! अशा बापांच्या मुली जर सुशिक्षित असल्या आणि त्यांना नवरा नाहीं पसंत पडला— आणि त्यांनीं आपली पसंती उपयोगांत आणली—तर हा समाज-

पुरुष--मुलगी बहकली म्हणून म्हणतो--मग मुलींना बरंवाईट कळेल असं शिक्षण तरी कशाला देतां त्यांना!

**दादा०**:--कां--वासंती तुला पसंत नाहीं वाटतं आमची यमुना 'वहिनी' म्हणून?--

**वासंती**:--मला बाई आतां कांहीं विचारूं नका,--दादा--खरं सांगूं का तुम्हांला, माझं बाई कपाळ दुखतंय मगापासून--

**दादा०**:--बरं बुवा--राहिलं आमचं बोलणं--मग काय भाउसाहेब--चला कीं जरा-दिवाणखान्यांत वसंतराव बसले आहेत तिथं! आज चार दिवस तर घोटाळेच चालले होते सगळे--जरा बोलूं या आपण दिवाणखान्यांत--

**दिलरुबा**:--( स्वगत ) हरकत नाहीं-नर्मदा नकोच आतां आपल्याला-यमुनाच बरीय-ताईनं माफी जवळजवळ मंजूर केलीच आहे! आणि तिचं येवढयानं नाहीं समाधान झालं तर जरा वेळानं डोळ्यांना पाणी लावून 'करुणरसच' उभा करूं तिच्यापुढं! मग काय बिशाद आहे ताई आपला राग सोडीत नाहीं! ( उघड ) बरं चला, ताईचंही जरा डोकं दुखतंय आतां, तिच्याही डोक्याला शान्तता मिळेल जरा!

**दादा०**:--बरं चला--वासंती, डोकं दुखतंय मग मेंथॉल नाहीं तर अमृतांजन कां नाहीं चोळीत जरा डोक्याला--बरं वाटेल जरा डोळयांतून पाणी गेलं म्हणजे! बरं चला भाउसाहेब.

**दिलरुबा**:--हं चला. ( दोघे जातात.)

**वासंती**:--हं! काय बोलायचं आतां! दादा सांगून गेले डोकं दुखतंय तर थोडंसं मेंथॉल नाहीं तर अमृतांजन चोळा कपाळाला, डोळयांतून थोडं पाणी गेलं कीं बरं वाटेल--माझा या गोष्टीनं संताप झाला--भावानं तरीही बेपर्वाई दाखविली--आतां

डोळ्यांतून पाणी येईलच आपोआप आणि मग बरं वाटेल ! हं—त्याला बाई वाटतं आपण गंमतच केली--पण या गंमतीनं होतं काय-झालंय काय-विचार आहे का त्याला ? अरेरे ! अखेर येवढं खरं—कितीही सुधारणा झाल्या-काय वाटेल तें झालं तरी अखेर बायका त्या बायका—आणि पुरुष ते पुरुष ! आतां बाई नर्मदेची समजूत कशी काढूं--कुठनं बाई तिला या दिवाळीच्या सुट्टींत बोलायची इच्छा झाली मला !

( नर्मदा येते.)

**नर्मदा:**—काय वासंती, झाला का निकाल त्या गोष्टीचा--

**वासंती:**—निकाल काय व्हायचा--आमच्या भाउसाहेबांचं तें काव्य आहे--

**नर्मदा:**—कबूल केलं त्यांनीं--

**वासंती:**—नर्मदे, खरं सांगू का तुला--हा आहे खरा माझा भाऊ, पण मला लाज वाटते त्याची. त्याचा आपला सगळा पोरकटपणाच !

**नर्मदा:**—जाऊं दे—तूंही तो विषय मनांतून काढून टाक ! त्या असल्या पाचकळपणाची झळ बायकांना सदोदित लागावी--असाच बहुतेक शाप आहे बायकांच्या जातीला--तुझा भाऊ काय आणि कोणी काय--सगळ्या पुरुषांची जात ही अशीच एक सारखी-बराय वासंती—

**वासंती:**—मग काय, जाणारच म्हणतेस आज—काय बाई मी बोलूं आतां—

**नर्मदा:**—वासंती—येवढया—गोष्टीबद्दल मला इतका संताप यायचं कारण नव्हतं—मी केव्हांच ती गोष्ट विसरून गेलें असतें. पण त्याचा बाई परिणाम झालाय भलताच—

**वासंतीः**—काय, आणखी काय झालं--

**नर्मदाः**—काय झालं आणि कसं झालं! या साध्या गोष्टी-मुळं—तिकडच्या मनांत भलताच संशय उत्पन्न झाला आहे--अग, हल्लीं माझ्याकडे पहातसुद्धां नाहींत--या क्षुल्लक गोष्टीमुळं माझ्या जन्माचं वाटोळं होणार कीं काय बाई--तिकडे हें तरी शोभतं का—

**वासंतीः**—काय ग, हें 'इकडे' 'तिकडे' प्रकरण काय आहे--हे 'इकडे' 'तिकडे' कोण, शाळिग्रामपंत वाटतं?

**नर्मदाः**—(स्वगत) अग बाई, भलतंच बोलून गेलें वाटतं मी! ( उघड ) अं ऽ वासंती, काय म्हणतीयस—(नर्मदा पदर सांवरून उभी रहाते. हातांनीं कांहीं तरी चाळा करते. त्यांत गळ्यांतील पोलक्याखालचें मंगळसूत्र बाहेर येतें.)

**वासंतीः**—कां ग, येवढी कावरीबावरी कां झालीस? आणि नर्मदे—थांब-थांब—हें ग काय बाई—लग्न व्हायचंय ना अजून तुझं—आणि गळ्यांत मंगळसूत्र तुझ्या--का--थट्टेनं बांधलंयस तेंसुद्धां—

**नर्मदाः**—अग जन्माचीच थट्टा झालीय, त्यांत याची भर आणखी—आतां तुला आणखी उघड कशाला सांगायला पाहिजे-माझं लग्न झालंय अगोदरच!

**वासंतीः**—हा बायजाबाई! आणि हे 'इकडे तिकडे' कोण शाळिग्रामपंतच वाटतं! बाई, बाई, बाई! आतां आलं हो माझ्या लक्षांत सगळं नाटक तुमचं—बरींच कीं ग आहांत—अन् पोरटे, मला अद्याप कळवलं नाहींस—आणि शाळिग्रामपंतांनीं तिकडेही कळवलं नाहीं त्यांच्या लग्नाचं--

**नर्मदाः**—अग, जसं तुझं माझं ठरलं होतं वर्गांत, 'प्रीति-विवाह' करण्याबद्दल, तस्संच वसंतरावचं आणि त्यांचं ठरलं होतं कॉलेजांत--आणि आमचं लग्न बाई 'अस तसंच' झालं! म्हणजे लग्नापूर्वी आमचीं तोंडओळखसुद्धां नव्हती–दोघंही अशा तऱ्हेनं प्रतिज्ञेच्या उलट वागलों म्हणून आम्ही आपलं लग्न तुम्हापासून गुप्त ठेवलं--पण त्याचं प्रायश्चित्त भोगतीयना आतां मी—तिकडे बाई दाट संशय आलाय माझ्या वर्तणुकीसंबंधानं! वासंती, मला बाई रडूं येतं—एकेक गोष्ट आठवली कीं—

**वासंतीः**—आणि मला बाई हंसायला येतंय तुला रडूं येत असलं तरी--अग बरीच की आहेस—आम्ही 'लग्नापूर्वी' केला नसेल येवढा दणदणीत 'रोमान्स' दाखवलात बाई करून तुम्ही–बरीच की ग आहेस! आचरट, बाष्कळ कुठली–फाजील नाहीं तर!! या शिव्याही बाई पुळपुळीत वाटतात मला! छान, छान हो! अगदीं छान केलंत--कवित्वशक्ति लढविलीत बाई अगदीं--आणि आम्ही अजागळासारखीं तुमच्या वडिलांना पत्र लिहीत बसलों!

**नर्मदाः**—बरं बाई–वासंती, झालं तें झालं; आतां आम्हांला उद्या गेलंच पाहिजे घरीं--पण घरीं जायच्या अगोदर बाई—तिकडचं मन साफ झालं पाहिजे--नाहीं तर पुरुषांची जात आहे, मला टाकून द्यायला कांहीं कमी करायचे नाहींत—आणि अगोदर सासरीं माहेरीं आग पेटलीच आहे तुमच्या पत्रानं--

**वासंतीः**—बाई बाई बाई—कमाल केलीत हो अगदीं—असलीं घरगुतीं नाटकं जर घरोघर रंगूं लागलीं—तर मग नाटक-कंपन्यांच्या पोटावर पायच आला म्हणायचा! वा! छान--

**नर्मदाः**—तें जाऊं दे बाई--पण त्यांची संशयनिवृत्ति कशी करायची--

**वासंतीः**—असं कर आतां, आपण वर जाऊन बसूं जरा—मला एकदां पोटभर हंसून घेऊं दे आणि मग—तिकडच्या संमतीनं ठरवूं—शाळिग्रामपंतांच्या संशय-निवृत्तीकरितां—त्यांना ताळ्यावर आणण्याकरितां 'हेमगर्भाची' मात्रा त्यांना कशी द्यायची—किती वळसे द्यायचे—चल—

**नर्मदाः**—चल बाई—

**वासंतीः**—हं चल, चालली—नर्मदे तूं बाई अगदीं शिकस्त केलीस हो—हं चला—नाट्यदेवते—नमन असो तुला! (नर्मदेच्या पाठीवर थट्टेनें थाप मारते. दोघी जातात.)

---

## प्रवेश पांचवा

(स्थळ—वसंताचा दिवाणखाना. दिलरुबा प्रवेश करतो.)

**दिलरुबाः**—क्षुल्लक अपराधाकरितां तीन महिने येरवड्याला जाऊन नवशिका चोर सुटून आला म्हणजे त्याला समाजांत मिसळायला जसं चोरट्याचोरट्यासारखं होतं—त्याप्रमाणं झालंय मला! आतां तो म्हातारा तरी आपला शब्द खरा करतो कीं नाहीं परमेश्वर जाणे! नाहीं तर एवढे प्रेम-प्रवेश करून मी आपला पुन्हा सडफटींग तो सडाफटिंगच! आतां तोंडाला कुलूप! संपली आमची अक्कल! आतां नुसती इकडून तिकडे शतपावली करायची! अरेच्या, वासंतीताई आणि नर्मदाताई इकडेच येत आहेत वाटतं! चला, आपण आपलं इथून पसार व्हावं! (जातो.)

( नर्मदा व वासंती प्रवेश करतात. )

**वासंतीः**—हें ग काय नर्मदे, अगदीं लपंडावासारखी काय धांवपळ चालविली आहेस आज सकाळपासून? घटकेंत इथं घटकेंत तिथं—हें उचक, तें उचक—

**नर्मदाः**—बोलूं नकोस बाई कांहीं! मला आपली धड्या तोंडानं घर गांठूं दे!

**वासंतीः**—मग कोण खायला आलांय काय तुला? आतां भेटूं देत तर खरं शाळिग्रामपंत—नव्हे शामभटजी! काय ग नर्मदे—

**नर्मदाः**—पुरे पुरे बाई मेले ते शामभट आणि चुलींत गेली ती सटवाई!

( शाळिग्राम व वसंत प्रवेश करतात. )

**वसंतः**—बराय, निघणारच म्हणतोस आज! ( नर्मदा व वासंतीकडे पाहून ) अरे वा! त्यांनींही आपली तयारी चालविलेली दिसते आहे!

**शाळिग्रामः**—नाहीं! मला मात्र गेलंच पाहिजे हं आज!

**वासंतीः**—बाई बाई बाई! मला किनई हंसायला येतंय अगदीं!

**वसंतः**—कां?

**वासंतीः**—काय सांगूं बाई आतां—

**नर्मदाः**—ए माझ्या मायबहिणी—जरा गप्प बैस ना बाई तूं आतां—

**वासंतीः**—हें पहा बाई काय तें, ( हंसते. ) नर्मदे! मीही बाई मर्यादा गुंडाळूनच. ठेवतें सध्यां! शाळिग्रामपंत—

**नर्मदाः**—( स्वगत ) आतां बाई करूं तरी काय! हं, नर्मदा-

ताई, भोगा आतां आपल्या आचरटपणाचीं फळं. पती म्हणजे किनई अगदीं देवासारखा मानायचा हो! आणि इकडे पहा आमच्या पति-देवांनीं आमची काय विटंबना चालविली आहे ती! हा कुठला कर्मभोग मी आपल्यामागं लावून घेतला, कुणाला ठाऊक?—बाई बाई आतां निसटूं तरी कशी मी यांच्या तडाक्यांतून! (हॅंडबॅग आपटते व बसते.)

**वसंतः**—मग काय शाळिग्राम—तुझ्या वडिलांकडून आमच्या पत्राचं उत्तर वगैरे कांहींच नाहीं आलं अद्याप—मग तुझ्या लग्नाच कसं काय?

**शाळिग्रामः**—भाषा करूं नकोस लग्नाची आतां—अगदीं निश्चय—शपथ—प्रतिज्ञा—लग्न करायचं नाहीं आपल्याला इथून पुढं!

**वसंतः**—अन् काय ग वासंती, तुझ्या मैत्रिणीचं कसं काय?

**नर्मदाः**—माझं डोकं दुखायला लागलं बाई या तुमच्या कट-कटीनं! मी जाऊन पडतें खालीं जरा!

**शाळिग्रामः**—बरं वसंतराव, मीही येतों जरा बाहेरून फिरून.

**वसंतः**—कां, दोघंही एका तिरीमिरीसारखे उठलांत, का अजून शेवटचा निकराचा प्रयत्न करून पाह्यचा आहे कीं काय?

**नर्मदाः**—वासंती, बाई बाई, शर्थ झाली हो तुमची! ही बसलें मी इथं. जाऊं द्या कुणाला एकटंच बाहेर जायचं असलं तर! संशय नको यायला कुणाला कांहीं! (एकीकडे तोंड करून बसते. शाळिग्राम जाऊं लागतो, तोंच दादा व यादवमामा प्रवेश करतात.)

दादा०:—वसंतराव, हे आले आहेत तुमच्याकडे कोणी तरी पाहुणे. आपण शालिग्रामपंतांच्या वडिलांना पत्र लिहिलं होतंत ना--त्याबद्दल आलेत वाटतं. यांचं नांव यादवमामा—

वसंत:—बसा, केव्हां आतांच्याच गाडीनं आलांत वाटतं !

यादव०:—हो.

वसंत:—काय निरोप वगैरे ! मी सहज पत्र लिहिलं, आपण समक्ष यायची विनाकारण तसदी घेतलीत—

यादव०:—छेः छेः, मी तेवढयाकरतां आलोंय असं नव्हे—सहज कांहीं दुसऱ्या कामाकरितां यायचंच होतं--तें दुसरीकडे उतरायचं तो इथं आलों. म्हटलं आमचा भाचा शालिग्राम आहेच इथं--सहज आपलीही ओळख होईल—आतां–आपल्याला पडेल थोडी तसदी !

वसंत:—छेः छेः ! तसं कांहीं नाहीं.

नर्मदा:—( स्वगत ) कोण, यादवमामा कीं काय—भरलीं ग बाई आतां माझीं शंभर वर्षं ! आणि पहा पहा मेला नाटक्या—आमच्यावरही ताण—तिकडचा मामा म्हणे--हं, पण आतां बरीक खाशी खोडकी जिरेल इकडची—मी आपली भोळी सांपडलें तर भास्वलीसारखी नाचवली मला ! आतां दाखवा म्हणावं काय अकलेची करामत दाखवायची असेल ती ! बाई बाई बाई, माझं डोकं दुखायला लागलं अगदीं—भोंवळ आल्यासारखं वाटतं आहे मला-ओकायला येईल कीं काय राम जाणे—चला बाई आपण आपलं जावं घरांत--आतां आई न् बाबा म्हणतील तरी काय ?

( जाते.)

वसंत:—( वासंतीस ) जा, आंत जा आतां, चहा वगैरे—

वासंती:--हो निघालेंच, चहा अन् फराळाचं--(जाते.)

**यादव०:**—छेः छेः ! प्रकृतीमुळं मी अगदीं एकभुक्त असतों-- मधें चहा वगैरे कांहीं नाहीं--संकोचानं नव्हे हो--

**वसंतः**—अरे वा ! शाळिग्राम, तूं का असा उभा ? माझं लक्षच नव्हतं इतका वेळ तुझ्याकडे--

**यादव०:**—अहो त्याला आतां कोडं पडलं असेल कदाचित् कीं आपले मामा इकडे कां आले, आणि शिवाय आतां त्यांनीं मुलगी पसंत केली म्हणतां--मग मामाला कशाला हवी मुलगी पहायला ! काय शाळिग्राम, असंच ना ?--

**शाळिग्रामः**—( स्वगत ) हा गृहस्थ येतांना भांग बिंग तर नाहीं पिऊन आला ? बेधडक सांगतो आहे माझा मामा म्हणून— अन् मगाशीं रस्त्यांत ओळख द्यायला तयारी नव्हती ! कां, आहे का नाहीं इरसाल ? आतां याच्या भाचेपणाचा अभिनय मी कसा काय करूं ? बरं, याचं माझं खरं नातंही उघड करतां येत नाहीं ! म्हणतात ना, चोरीचा मामला—तरी वेळ आली ! आतां स्वारी ज्या कांहीं गुप्त कानपिचक्या मारील त्या सगळ्या सहन करणं भाग आहे ! पण आतां बोलूं काय याच्याशीं ? अहो मामा, म्हणून गळ्यांत पडूं--का करूं तरी काय--मी काय करीन तें खरं, पण तो लेकाचा पडला आहे का नाहीं माझ्या गळ्यांत मामा म्हणून ! (उघड) नाहीं, तसं कांहीं नाहीं—पत्र वगैरे आगाऊ कांही न येतां एकदम आपणच आलांत म्हणून वाटलं कीं त्या पत्रामुळं काका रागावले काय माझ्यावर ?

**यादव०:**—अरे हें बघ, तुमच्यावर रागावून आतां कांहीं उपयोग नाहीं, हें वडील माणसं जाणतात आतां—म्हणच आहे ना कीं, आपल्या पायाचा जोडा मुलाच्या पायाला येऊं लागला कीं पुत्रेमित्र समाचरेत !

**शालिग्रामः**—( स्वगत ) हा म्हणींतला 'जोडा' आहे का शालजोडींतला ठेवणीचा दिला आहे आम्हाला भेट म्हणून—एकदम मोठ्यांदा ओरडून सांगूं का, हें सर्व खोटं आहे म्हणून—मला अगदीं अंधारकोठडींत कोंडल्यासारखं—किंवा गळ्यापर्यंत चिखलांत पुरल्यासारखं वाटतं आहे मला—का यांतच माझा जीव जायचाय! ( उघड ) पण मामा—मामाभाच्यांबद्दल नाहीं का अशी म्हण एखादी ?—

**यादव०ः**—हो, वा नाहीं कशी—सारा गांव मामाचा आणि एक नाहीं कामाचा! तुला आतां अगदीं असंच झालं असेल कीं नाहीं—सांगूं तुझ्या मनांतली गोष्ट—तुला वाटत असेल बघ—कीं आतांपर्यंत मोठ्या ह्यानं आपण वागलों इथं—पण आतां मामा आले! या विषयांतलं आपलं वर्चस्व संपलं—आतां सारा गांव मामाचा! कां, पटली का म्हण ?

**शालिग्रामः**—( स्वगत ) पटली म्हणजे काय—नामांकित पटवेकऱ्यांशींच माझी आतां गांठ पडली आहे। आतां मी येवढाच विचार करतों आहें कीं या मामाला थांग लागूं न देतां आपलं चंबूगवाळं आटपून परस्पर आपल्या घरीं एकदम पसार व्हायचं कसं—मला आतां एकदां स्टेशन पकडूं दे! मग करा मामा आपल्याला काय करामत करायची असेल ती! मग आपली ती भाची आणि आपण मामा—वाटेल तो सावळागोंधळ घाला इथं! आपण आतां एकदम थेट मुक्कामाला—बरं वसंतराव, गोंधळलोंच होतों मी—( उघड ) चला, मामा आतांच गांवाहून आले आहेत. मामा, काढा ना कपडे वगैरे—चला हातपाय धुवायला—

**यादव०ः**—हो हो, वा! माझीही तयारीच आहे!

( यादवमामा व दादा यांखेरीज सर्व निघून जातात. )

**यादव०:**—हं, मगाशीं माझी पुरी खात्री नव्हती म्हणून आपल्याला मग सांगेन असं म्हटलं, आतां बोला—आपल्याला काय बोलायचं आहे तें !

**दादा०:**—नाहीं, विचारायचं म्हणजे येवढंच—मगाशीं शालिग्रामपंतांनीं आपल्याला रस्त्यांत अडवलं तेव्हां आपण त्याला ओळखसुद्धां दिली नाहींत आणि आतां पुन्हां त्यांचे मामा म्हणूनच घरांत घुसतां आहांत, याचा अर्थ काय ?

**यादव०:**—याचा खरा अर्थ सांगूं तुम्हाला—मी या शालिग्रामचा मामा खरंच नव्हे ! ती लग्नाची म्हणून जी मुलगी आपण म्हणतां—नर्मदा नांव तिचं—ती माझी सख्खी भाची—

**दादा०:**—हरे राम ! म्हणजे तुम्ही त्याच पंथांतले कीं काय ? आणि या वयांत ? या घरांत तरी काय, मला आल्याला चार दिवस झाले ! मी आपली हकीकत सांगितलीच मगाशीं तुम्हाला—मगाशीं दरवाजांत भेटलांत तेव्हां ! पण आल्यापासून मी पहातों आहें—या घरांत, क्षणांत एकमेक बहिण-भाऊ—क्षणांत एकमेक नवरा-बायको तर क्षणांत दोघंहि अविवाहित मुंजे ! आतां आणखी आपण त्यांत भर घातलीत ! काय हो, गोत्र काय तुमचं ?

**यादव०:**—ज्याला नाहीं गोत्र तो काश्यपगोत्री—माझंही गोत्र काश्यपच—पण मी लग्नाचा नाहीं हो—माझं लग्न होऊन चार पोरांबाळांचा धनी आहें मी ! आणि सर्व प्रपंच सोडून—आतां इकडे आलों म्हणजे काय—आमच्याच लाग्याबांध्याचीं दोन पोरं इकडे या घोंटाळ्यांत सांपडून रडत आहेत त्यांना खुळखुळा वाजवून खेळवायला आलों आहें मी !—

**दादा०:**—बरं, थट्टा जाऊं द्या. आहे काय भानगड ही ?

**यादव०:**—खरं सांगायचं म्हणजे भानगड कांहीं नाहीं—आणि थट्टाही पण नव्हे! मगाशीं सांगितलंच नर्मदा ही माझी सख्खी भाची आणि आश्चर्य वाटेल आपल्याला—ज्याला मी शाळिग्राम म्हणून हांक मारतों आहें ते शाळिग्रामपंत—माझे भाचेजांवई!

**दादा०:**—म्हणजे लग्न व्हायचय का ठरलंय?

**यादव०:**—नुसतं ठरलं नव्हे लग्न होऊन आज सहा महिने झाले! परवां झाली काय गंमत—या तुमच्या वसंतरावांच्या सहीनं शाळिग्रामपंताच्या वडिलांना आणि वासंतीच्या सहीनं आमच्या नर्मदेच्या वडिलांना 'शाळिग्राम-नर्मदेच लग्न आम्ही ठरवून देतों' म्हणून पत्रं आलीं—झालं! दोघेही पडले घोटाळ्यांत—दोघांनाही वाटलं आपलीं पोरं सोनेरी टोळीच्या तडाक्यांत सांपडलीं म्हणून! म्हणून काय घोटाळा आहे तो पहाण्याकरितां मी समक्ष आलों—हं थांबा, मला वाटलंच हें असं होईल म्हणून. मांजरीचीं पिलं मांजरीभोंवतीं घोटाळतात ना, तशी ती पहा नर्मदा घोटाळते आहे—आणि आपल्याला इथं माझ्याशेजारीं पाहून इकडे यायला बिचकते आहे—

**दादा०:**—अरे खरंच! बरं, जातों तर मग मी! मामा, हा बुद्धिबळाचा डाव बसा आपलेआपणच खेळत.

**यादव०:**—तसं कां पण? पाहूं या येते का ती तुम्ही असतांनाच! आचरट पोर—

**दादा०:**—जाऊं द्या मामा, बोलून चालून पोरच ती!

**यादव०:**—अहो, पोरं कशानं आतां हीं! दोन मुलांची वयं झालीं यांचीं—

**दादा०:**—पण अजून झालीं नाहींत ना—तोपर्यंत पोरंच हीं! पहा कशी कावरीबावरी झाली आहे ती—अगदीं रडकुंडीला

आली आहे--आपल्याला नाहीं बुवा हें पहावत--हं मामा, हांक मारा तिला !

**यादव०:**--छट् ! आपण नाहीं हांक मारणार ! पाहूं या तर खरी आतां गंमत--

( नर्मदा येते.)

**नर्मदा:**--मामा--

**यादव०:**—आं ! काय वेड लागलं काय मुली तुला ! कुणाला म्हणतेस मामा म्हणून ?

**नर्मदा:**—हें रे काय मामा—

**यादव०:**—अरे वा, पुन्हां तेंच ! हा चांगला गळेपडू धंदा ! चला दादा, आपल्याला काम आहे ना तिकडे--( जाऊं लागतो. नर्मदा आडवते.)

**नर्मदा:**—हें बघ-मामा, आतां पायां पडूं का तुझ्या ?

**यादव०:**—काय, पायां पडूं का म्हणून विचारतां ! हं पडा कीं-- बोलूनचालून मोठीं माणसं आम्ही--माझ्या पायां पडा-- यांच्याही पायां पडा ! चांगला तोंडभर आशीर्वाद देऊं—" अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ! " म्हणून !

**नर्मदा:**—बघ हं मामा--असं करशील तर घरीं गेल्यावर आईला सांगेन--

**यादव०:**—काय सांगणार ? कीं माझं लग्न लवकरच जमव ! मला सांगितलंच आहे मग तुझ्या आईनं—कीं नर्मदेचं लग्न लवकरच जमव म्हणून—अन् तेवढयाकरतांच तर मी इकडे आलों आहें ! आतां कांहीं फार दिवस नाहीं लागायचे, एकदोन दिवसांतच मुहूर्त कायम करतों !

**नर्मदा:**—मामा, असा कसा रे निर्दय तूं—

[ राग—जंगला, ताल—त्रिताल ]

**कैसा करितोसि कोपा ॥ ध्रु० ॥**

**मग अपराधा विसरुनि । होई शांत, बघुनि**
**अनुतापा ॥ १ ॥**

**यादव०**:—काय म्हणतां ?

**नर्मदा**:—हें बघ किनई मामा, इथं येईल नाहीं तर कुणी आतां ! आणि मग मला बोलायचीही पंचाईत होईल !

**यादव०**:—बरं होईल बुवा इतक्यांतल्या इतक्यांत कुणी आलं तर इथं !

**नर्मदा**:—आतां डोकं फोडून घेईन हं तुझ्या पायांशीं—-

**यादव०**:—-आणि तें काय म्हणून—-माझ्या पायांवर हें पाप कशाकरितां ? दुसऱ्या काय जागा नाहींत कुठं ?

**नर्मदा**:—बरं हो बाई, चालूं दे तुझा फाजीलपणा—तुझा स्वभाव म्हणजे अस्वलाच्या गुदगुल्या नुसत्या—-हंसवून हंसवून ठार मारायचास ! बरं बाई, जें होईल तें होईल—मी आपली आतां जातें घरांत आणि एका कोंपऱ्यांत एक फटकूर टाकून निजून रहातें आपली कशी. काय होईल तें होवो. उठायचं म्हणून नाहीं तिथून ! (जाऊं लागते.)

**यादव०**:—-काय—दादा—परत हांक मारूं का ?

**दादा०**:—फारच निर्दय बुवा तुम्ही, मारा कीं हांक—

**यादव०**:—नमु, ए नमुताई—

**नर्मदा**:—( परत येऊन उसन्या रागानें ) आतां कां रे हांक मारली मला—बोलायचं आहे का नाहीं धड माझ्याशीं तुला ? पण खरंच काय रे मामा, आई रे काय म्हणाली तें पत्र पाहून— आणि बाबा फारच रागावले असतील—-

**यादव०:**—हो, तीं दोघं तर रागावलींच आहेत, पण तुझा सासराही आला होता आपल्याकडे फणफणत—

**नर्मदा:**—हं !

**यादव०:**—हं ! पण काय हो नर्मदाबाई, हा फार्स आहे काय एकंदर—

**नर्मदा:**—खरं सांगू का मामा—तसं पाश्यला गेलं तर कांहीं नाहीं—साधी गोष्ट होती ती. पण बोलघोल म्हणतां बाई—काव्याचा नायटा झाला त्याचा !

**यादव०:**—पण झालं काय—

**नर्मदा:**—पण बघ मी तुला हें सांगितलं म्हणून तिकडे बोलायचं नाहीं ! अंऽ.

**यादव०:**—बरं—

**नर्मदा:**—अरे, ते वसंतराव आहेत ना—ते त्यांचे कॉलेज-मधले मित्र, आणि वासंती ही माझी वर्गातली मैत्रीण. आम्ही आपल्या लग्नाचं त्यांनीं किंवा मी कुणीच या दोघांना कळवलं नव्हतं ! कारण—

**यादव०:**—तुमचा ‘प्रीतिविवाह’ झाला नव्हता म्हणून आतां लग्न झाल्यानंतर या चहाटळपणानं आपल्या जुन्या लग्नाला—प्रेमविवाहाचं पॉलिश करायचा ठरला तुम्हा दोघांचा विचार—

**नर्मदा:**—नाहीं; तूं बाई बोलूं नकोस मधें—

**यादव०:**—हं बराय—पुढं काय झालं ?

**नर्मदा:**—पुढं—या दिवाळींत वसंतरावांनीं सहज तिकडे बोलावलं—आणि वासंतीनं मला बोलावलं—आम्हाला दोघांनाही आम्ही एकाच ठिकाणींच जात आहोंत ही नव्हती कल्पना—दोघंही एकाच गाडीनं आलों—तों स्वारीनं अगोदरच विचार

ठरवला होता कीं वसंतरावंनीं विचारलं तर—'आपलं लग्न झालं नाहीं असं सांगायचा' अन् तसंच सांगण्याबद्दल त्यांनीं बाई मला गळ घातली. आणि मीही सांगितलं वासंतीला तसंच आणि तेवढ्यावरनं त्या दोघांनीं किनई बाई—लिहिलीं दोन पत्रं—एक सासरीं आणि एक आपल्या घरीं—त्या पत्राचं त्यांनीं आम्हाला कळवलं. अन् जी बाई माझ्या उरांत धडकी बसली तो तूं आलास आणि तुझी आमच्यावरही ताण—तूं तर थाप मारलीस कीं—तूं तिकडचा मामा म्हणून—

**यादव०**:—दादा, ऐकली का गमंत? तुम्हां आम्हाला आहे का असा कधीं अनुभव या जन्मांत—

**दादा०**:—भले शाबास—मुळांत कांहींच नसतांना—अगदीं भुताटकीसारखा प्रकार दाखवलात कीं आम्हांला—हं नर्मदाताई, आहांत खऱ्या अचपळ—आमची यमुना फार साधी—अगदीं नदीचं पाणी, ओघांनीं वाहयचं—अधेंमधें वळणं नाहींत कधीं—बरं बसा आतां तुम्ही बोलत आणखी कांहीं करायच्या असल्या तुम्हाला गुजगोष्टी तर—मी म्हातारा कशाला मधें?

**यादव०**:—रहा हो तुम्ही—

**नर्मदा**:—नाहीं हो दादा, जा तुम्ही आतां. मला आणखी एक गोष्ट सांगायची आहे मामांना—

**यादव०**:—आणखी एक गोष्ट सांगायची आहे मामांना—

**दादा०**:—आणखी राहलं आहेच का कांहीं तरी! मामा, तुम्ही आम्ही मरेपर्यंत या भानगडी संपायचं लक्षण नाहीं दिसत! बरं, आपण वैतागलों बुवा या कहाण्यांना—मामा—जातों आता आम्ही.

यादव०ः—बरं जा, ( दादा जातात. ) काय ग ए पोरटे, सगळं खरं, पण लग्न झालं नाहीं म्हणून सांगितलंस तें लाज नाहीं वाटली तुला कांहीं !

नर्मदाः—पण त्यांनींच तसं सांगितलं, माझा बाई नव्हता विचार—

यादव०ः—अग पण हा काय आचरटपणा—तूंच उलट त्यांची फजिती करायचीस तें.

नर्मदाः—पण मामा, म्हणतात ना ~~प्रेर्व~~ " असे पति देवाधि ललनांना ! "

यादव०ः—हं खराय—नवरे असले दगडी शाळिग्राम असले—

नर्मदाः—हं मामा, जास्त नाहीं हं बोलायचं—माझंही त्यांत अंग आहेच कीं थोडं—

यादव०ः—तर तर !—त्याशिवाय तुमचं हें अविवाहित-पणाचं नाटक रंगलं असतं कसं ? बरं, आणखी काय सांगणार होतीस—

नर्मदाः—अगदीं खासगी आहे तें. पण रागवायचा नाहींस ना माझ्यावर—बाकी माझी खात्री आहेच म्हणा तूं रागावणार नाहींस म्हणून ! कारण मामा म्हणजे पुरुष-वेषांतली आईच कीं नाहीं !

यादव०ः—बरं पुढं—

नर्मदाः—मला बाई कसंसंच होतंय सांगतांना—

यादव०ः—बराय, नको सांगूस—

नर्मदाः—नाहीं, पण सांगायलाच पाहिजे !

यादवः—बरं, सांग तर मग—

नर्मदाः—बरं, सांगू ?

**यादव०:**—हं सांग.

**नर्मदा:**—अरे—हें बघ किनई—आम्ही दोघ इथं आलों, अविवाहित ठरलों, तेव्हां मगाशीं तुला भेटला होता ना तो वासंतीचा भाऊ—वासंती सहज थट्टेनं त्याच्यादेखत मला म्हणाली, 'माझी वहिनी होतेस का' म्हणून—मी बाई अशी खजील झालें आणि त्या वेळेपासून मेला माझ्या राशीला बसल्यासारखे प्रेमाचे पाढे ऐकवतो आहे मला! कुणास कळे! तिकडे कसा संशय आला तो या गोष्टीचा! तेव्हांपासून माझ्याकडे असे डोळे वटारून पहातात—आणि तेव्हांपासून चुकूनमाकून चार शब्द बोलायला सांपडत तेहि संपले. अगदी पहातसुद्धां नाहींत हल्लीं माझ्याकडे—

**यादव०:**—ही आणखी भानगड झाली कां त्यांत—मग तुमचं नाटक चांगलंच रंगलं असेल म्हणायचं!

**नर्मदा:**—हो! तुझी होतीय थट्टा पण माझा जीव चाललाय इकडे!

**यादव०:**—म्हणजे! मी सांगितलं होतं काय तुला हे असले प्रताप करायला! बाकी मजा खरीच हं! जोंपर्यंत मनांत खरा उदात्तपणा आला नाहीं तोंपर्यंत नुसतं स्त्रियांना बरोबरीच्या नात्यांनीं वागवून उपयोग काय? वास्तविक शाळिग्रामपंतांच्या लक्षांत हें यायला पाहिजे होतं कीं जिथं रोमान्सकरितां म्हणा—थट्टा म्हणून म्हणा—अगर चार दिवस गमत म्हणून म्हणा—स्वतःच्या पूर्ण संमतीनं—हा आंधळ्या कोशिंबीरीचा खेळ आपण होऊन सुरू केला—तिथं कोणत्या गोष्टीला किती महत्त्व द्यायचं याचाही विचार करायला नको का? बरेच अजागळ आहेत म्हणायचे तुझे शाळिग्रामपंत एकंदरींत! ज्या गृहस्थाला स्वतःच्या लग्नाच्या बायकोबद्दल किरकोळ गोष्टींनीं संशय येतो—काय आत्मविश्वास

दांडगा असेल त्या गृहस्थांचा—भले शाबास—म्हणजे यांची बायकांच्या बाबतींतील उदारता म्हणजे सर्कस चालू असतांना देखाव्याकरितां पिंजऱ्यांतून मोकळया सोडलेल्या—सिंव्हाइतक्याच किंमतीची तर ! मग काय नर्मदाबाई, अशी एक भानगड निर्माण झालीय म्हणतां आणखी—मग या बाबतींत मी काय करावं असं आपलं म्हणणं आहे ?—

**नर्मदाः**—अगदीं मोकळया मनानं सांगू ? हें बघ—त्यांनीं माझ्याबद्दल असा संशय घेतला—मलासुद्धां अगदीं चीड आलीय बघ या गोष्टीची—पण मी बाई काय करणार चीड आली तरी—पण मामा, एवीतेवी प्रत्येक गोष्टीचा फार्स झालाच आहे. आतां बाई आम्हाला एकदां घरीं घेऊन चल !

**यादव०ः**—( विचार केल्यासारखें दाखवून ) बरं, ठरलं तर मग—काय कळलं—म्हटलं बराय ठरलं तर मग—ठरलं, शाळिग्रामपंतांची—घरीं गेल्यावर सोळा आणे फजिती करायची ! बरं, नर्मदाबाई, तुम्ही आतां असं करा--

( शाळिग्राम प्रवेश करतो.)

**शाळिग्रामः**—( स्वगत ) अरेच्या—मामा आणि भाची ! जमला वाटतं मिलाफ—आणि हीं दोघं मिळून माझी एकट्याची फजिती करणार कीं काय ! काय भलती परिस्थिती निर्माण केली मी आपणहून—एकवार वाटतं, नर्मदेबद्दल संशय घेणं म्हणजेसुद्धां पाप—पण पुरावा अगदीं विरुद्ध बोलतो आहे ! अशी अंतःकरणांतून चीड आली आहे त्या गोष्टीची—पण तोंड दाबून बुक्क्यांचा मार, अशी स्थिती झाली आहे माझी ! माझ्या मूर्खपणाचीं फळं मी भोगतों आहें—त्याबद्दल कुरकुरून कसं चालणार. हें नाटक आतां आटपतं कसं घ्यायचं—गोडीगुलाबीनं या मामाला बनवून

अब्रूनिशीं सहीसलामत घर कसं गाठायचं—याच्याशीं बोलण्याचा मी आतां प्रयत्न करून पहाणार आहें—पण नर्मदेची धिंडका आहे ना तिथंच—तिचं तोंड पाहूं नये असं वाटतं मला—पण करणार काय—इथं नाहीं निकाल लागला त्या गोष्टीचा तर घरीं गेल्यावर पाहूं—पण–तें कांहीं नाहीं, हीच वेळ बरी आहे मामाशीं बोलायला. (उघड) काय मामा—

**यादव०:**—हो, आलास–ये—हं मुली, शिक्षण कुठपर्यंत झालंय तुझं ? शाळिग्राम, बाकी मुलगी सोळा आणे पसंत केलीस—परीक्षा घेतोय तिचीच—काय ग, अशी लाजतेस काय—शिकली आहेस कुठपर्यंत—

**नर्मदाः**—लग्न होईपर्यंत !

**यादव०:**—बरं, वय काय तुझं ?

**नर्मदाः**—अठरा वर्षें ! ( स्वगत ) काय बाई तरी मामा आहे—आतां मी करूं तरी काय या वेळेला—याच्या प्रश्नाला उत्तरं द्यावीं तरी पंचाईत. इकडे वाटेल कीं माझी थट्टा चालविली आहे, बरं न द्यावींत तर इकडे मामा—हा असा !

**यादव०:**—काय शाळिग्राम, अठरा वर्षं म्हणते वय—गद्धे-पंचविशींत यायला अजून--एकोणीस, वीस, एकवीस, बावीस, तेवीस, चोवीस, पंचवीस—सात वर्षं अवकाश आहे अजून ! मग तुमचं हिचं जमेलसं वाटत नाहीं—कारण आपलं तर वय झालं त्या मानानं--

**शाळिग्रामः**—मामा—मामासाहेब—

**यादव०:**—ओ, हांक मारली वाटतं मला तिकडे कोणी तरी ! बरं शाळिग्राम, हा आलोंच हं मी-- ( जातो.)

**शाळिग्रामः**—आतां या झोंपीं गेलेल्या माणसाला जागा कसा करायचा ? हं, काय ग नर्मदे—

**नर्मदाः**—इश्य ! माझ्यावर काय चिडतां असे !

**शाळिग्रामः**—आई अंबाबाई ! आतां तरी आटप ना लव-कर ! नाहीं तर मरूं दे तें सामान इथंच अन् कोंकलूं दे तुझ्या मामाला इथंच---हं चला बायजाबाई, असंच्याअसंच आपण स्टेशन गांठूं—नाहीं अजून ऐकत ? अरेरे ! आतां काय करूं— ( नर्मदेचा हात धरून ) आतां बऱ्या बोलानं ऐकलंस तर ठीक-- नाहीं तर अशी ओढीत नेईन बघ तुला स्टेशनपर्यंत ! ( तिला ओढूं लागतो. वासंती प्रवेश करते.)

**वासंतीः**—धांवा हो धांवा, धांवा हो धांवा---शाळिग्रामपंत, इतके कसे बाई हे तुम्ही ? एखाद्या मुलीच्या अंगचिकटीला जाणं शोभतं का तुम्हाला ? छे बाई ! अजून कसं कुणी येत नाहीं ? धांवा हो धांवा---शाळिग्रामपंत—

( सर्वजण येतात.)

**दिलरुबाः**—ही काय भानगड आणखी ? पण आपण आतां गप्प बसून काय होईल तें पाहावं—नाहीं तर परवांसारखी 'श्रीमुखांत' खायचा प्रसंग यायचा आणखी ! ( एका बाजूला जाऊन उभा रहातो.)

**वसंतः**—काय, काय झालं वासंती, ओरडत कां होतीस ? काय रे शाळिग्राम—

**शाळिग्रामः**—शाळिग्राम गेला चुलींत ! हो, हो ! आहोंत आम्ही लग्नाचीं नवराबायको ! मग काय म्हणणं आहे तुमचं ? मीं माझ्या बायकोचा हात धरला—म्हणणं काय तुमचं ? न्या मला फरासखान्यावर—

**वसंतः**—हें काय, ही काय भानगड ?

**यादव०**:—काय रे शाळिग्राम—कोण तुझी बायको ? लग्न केव्हां झालं तुझं ?

**नर्मदाः**—मामा, आतां जोभ हांसडून प्राण देईन हं तुझ्या पायाशीं—हो, हो! आहोंत आम्ही लग्नाचीं नवराबायको—काय म्हणणं आहे तुमचं ? ( शाळिग्रामकडे पहात ) चला हो जाऊं आपण आपले गांवीं निघून !

**यादव०**:—मग मी तरी कशाला राहूं इथं ? बराय मंडळींना, रामराम—

**वसंतः**—चला, जायचं नाहीं कुणी आतांच्याआतां अगोदर चहा घेतल्याशिवाय ! वासंती, ही काय भानगड आहे ग एकंदरींत ?

**वासंतीः**—मग सांगेन मी आपल्याला ! अहो, कांहीं नाहीं ! सगळं नुसतं नाटक आहे ! ( वसंताच्या कानांत कुजबुजते.)

**वसंतः**—असं का ? असो, पण आतां तरी सगळं ठीकठाक ?

**वासंतीः**—खरंच बाई, मलासुद्धां या सगळ्यांचा हा गोंधळ पाहून असं झालं होतं कीं—आपण करायला गेलों काय आणि झालं काय ! पण बाई—नुसता आपला छोटासा संशयकल्लोळ झाला !

[ राग—भैरवी, ताल—त्रिताल ]

**गमत श्रीरंग भरला सकल । चल अचल व्यापी**
**विश्व सारे ॥ धृ० ॥**
**नटपट जणुं घे नव वेषासी । सतत हराया भव**
**दुरितासी ।**
**चालवितो विश्व हें जणुं गिरिधारी । प्रेमरंगीं**
**रंगे ॥ १ ॥**

**यादव०:**—पण काय हो शाळिग्रामपंत, आमचे भाचेजांवई—

**वसंतः**—काय, भाचेजांवई !

**यादव०:**—हो हो, भाचेजांवईच ! मलाही थोडंसं नाटकीच बनावं लागलं ! मीं या नर्मदेचा मामा—

**दिलरुबा:**—( स्वगत ) अरेच्या ! हीं लग्नाचीं नवराबायको आधींपासूनचींच आहेत तर ! केवढं पाप करीत होतों मी ! लग्नाच्या बायकोवर प्रेम करण्याचा प्रयत्न केला म्हणूनच 'श्रीमुखांत !'

**यादव०:**—आतां मंडळींनो, या गोष्टीचा तुम्हालाही कंटाळा आला असेल ! आतांपर्यंत झालेल्या भानगडींवरून—शाळिग्राम-पंतांनीं बोध घेतलाच असेल कीं, ज्याला 'रोमान्स' करायचा आहे—त्याला लग्नानंतरही करतां येतो—लग्नाच्या अगोदरच कांहीं धांगडधिंगा घालायला नको—आणि स्वस्त्रीविषयीं प्रत्येकाची भावना किती नाजूक असते—हें शाळिग्रामपंतांना स्वतःच्या अनुभवावरून कळलंच असेल ! तेव्हां बायकांच्या बाबतींत किती मर्यादेपर्यंत वागायचं याचा ते धडा घेतीलच. आतांच मजा पहा ना—शाळिग्रामपंतांच्या मनांत आमच्या नर्मदेविषयीं कांहीं संशय आला आहे तेवढा—

**शाळिग्रामः**—मामासाहेब, संशय नाहीं कांहीं नाहीं. आमच्या सौभाग्यवती पंचपतिव्रतांपैकीं सहावी पतिव्रता आहे ! आम्ही संशय घेतला, झक् मारली ! त्याबद्दल 'श्रीमुखांत' मारून घेतों आमच्या आम्ही !

**नर्मदा:**—इश्य, संशय कसला घ्यायचा बायकांबद्दल ?

**दादा०:**—अरे वसंता, तें सगळं खरं, पण आम्ही ज्या कारणाकरितां आलों त्याची काय वाट ?

**वसंतः**—दादा, तुम्ही आतां निर्धास्त असा! यमूचं आणि ( दिलरुब्याकडे पाहून ) काय, भाउराव, पसंत आहे ना आपल्याला?

**दिलरुबाः**—अं—???

**वसंतः**—छे छे! बोलण्याचा नका प्रयत्न करूं. मी समजलों काय तें. दादा, नक्की झालं आतां हें! आजच मी आमच्या श्वशुरांना लिहितों याबद्दल!

**दादा०ः**—काय यमुने, झालं ना आतां तुझ्या मनासारखं?

**यमुनाः**—इश्य!

**यादव०ः**—मग, मी घेऊं कीं काय पुढाकार—आण यमुने तुझा हात इकडे—दिलरुबासाहेब आपला—

**वसंतः**—नको, आतांच घाई नको—तेवढयाकरितां आपण 'हाताला हात' हें स्वतंत्र नाटक निराळंच करूं—

**नर्मदाः**—आतां मामाला असं झालंय—कीं त्याच्या कर्तबगारीचा वावच राहिला नाहीं कुठं, तेव्हां—

**शाळिग्रामः**—मग मामासाहेब मोठेपणानं आम्हाला उपदेश तरी करा थोडा—आम्ही आतांपर्यंत—काय बरं—

**यादव०ः**—नुसती अकलेची फुलवाजी उडविलीत—यांत मी आपल्याकडे मोठेपणा घेऊन तात्पर्य काय सांगूं? उपदेश तरी काय करूं—तरी पण सर्वांना उपयोगी पडेल असं तात्पर्य आणि उपदेश मी एका वाक्यांत करतों—

'सत्य सदा बोलावें। सांगे गुरु आणि आपुला बाप!'
बराय, चला आतां आपआपल्या घरीं जाऊं—

**शाळिग्रामः**—हं नर्मदे, चला आतां!

**नर्मदाः**—हं, आलें हं!

**वसंतः**—खामोष! चूप, बी क्वाएट! आपण सर्वजण मिळून आतां 'कोरस' म्हणूं म्हणजे आपले हे उदारहृदय प्रेक्षक आपली ही वेडीवांकडी सेवा गोड मानून घेतील—

**यादवः**—हं वसंतराव, 'हंसक्षीर' न्याय नाहीं आला अजून—

**वसंतः**—तो राहिला फक्त पुस्तकांत—अहो, हल्लीं लोक काय मत्सरी झाले आहेत—कुणाला कुणी बरं म्हटलेलं पहावत नाहीं! बरं, तें जाऊं द्या! आतांपर्यंत भाषासरस्वतीशीं आपण केलेला हा विनोद पाहून प्रभु लक्ष्मीनारायण आपल्यावर अखंड कृपा करील!

## ईश-स्तुति

[ राग—मालकंस, ताल—त्रिताल ]

**अजि शरण तुजसि प्रभु जगदुद्धार।**
**भय हरुनि नेई भव जलधिपार ॥ ध्रु० ॥**
**सतत धरुनियां अभय वर करा।**
**या भुवनिं सुख शान्ति वितरा।**
**करा सकल भय खलसंहार ॥ १ ॥**

